# श्रीभगवद्गीता

# (The Secret Knowledge)



**" केवळ एकमात्र श्रीकृष्ण सर्व जीवांचा पालन पोषण करणारा आहे , माणस व देव नव्हे "**

।। नित्य श्रीभगवद्गीता , पुराणें , रामायणाचा पाठ करा धन, संपत्ति आणि मोक्ष मिळवा ।।



---

# हे कुरुश्रेष्ठ अर्जुना !

**"जो यज्ञ करीत नाही त्याला (अल्प सुखविशिष्ट) मनुष्यलोक सुध्दा सुखदायक नाही ,मग अन्य (पर) लोक व पुढील जीवन कसे सुखदायक असतील (मनुष्याला नित्य "गीता पाठ" ज्ञानयज्ञ आणि "हरे कृष्ण" जपयज्ञ अवश्य केला पाहिजे) ||भगवद्गीता||4:31||"**

---

**"नित्य "हरे कृष्ण" मंत्र लिहा व "श्रीगीतापाठ" करा धन, संपत्ति आणि मोक्ष मिळवा"**

---

## भक्तियोग

**"हरे कृष्ण हरे कृष्ण ,कृष्ण कृष्ण हरे हरे ।**
**हरे राम हरे राम, राम राम हरे हरे ।।"---**निरंतर जप व श्रवण करा

---

**"ॐ नमो भगवते वासुदेवाय।।"**

---



**************** ॐ नमो परमात्मने नम: ****************

# ।। श्रीमद्भगवद गीता ।।

# (The secret knowledge)

## ☙(मराठी)☙

----------------------संदर्भ--------------------------

१.श्रीमद्भगवद गीता मराठी (**Android app**)

-----------------------------------------------------------

"**श्रीकृष्ण** : परंतु दुसरी एक सनातन , अनादि अशी प्रकृति आहे ,जी या व्यक्त (स्थूल) आणि अव्यक्त (सुक्ष्म) पदार्थांच्या पलीकडची आहे, ती श्रेष्ठ आहे. संपूर्ण जगाचा नाश झाले जरी ,ती (दिव्य) प्रकृती कधीच नष्ट होत नाही ||8:20|| "

**चला जाऊया भगवंताच्ये घरी**

**(श्रीकृष्ण धाम, अक्षर ,वैकुण्ठ धाम)**

# विषयानुक्रम

(भाग-१)

---

## श्रीपृथ्वी देवी म्हणाली

हे भगवान ! हे परमेश्वरा ! हे प्रभो ! प्रारंब्ध (भाग्य अनुसार) कर्माला भोगत असता मनुष्यला एकनिष्ठ भक्ति कसे मिळू शकते ||1||

## श्रीविष्णु म्हणाले

प्रारंब्धकर्माला भोगत असता जो माणूस नेहमी श्रीगीताचे अभ्यासात (पाठात) आसक्त आहे ,तोच या संसारात मुक्त व सुखी आहे आणि सर्व कर्मांत (व कर्मफलात) आसक्तरहित आहे ||2|| ज्या प्रकारे कमलाची पाने पाण्याला स्पर्श करू शकत नाही, त्याच प्रकारे जो माणूस श्रीगीताचे ध्यान करतो त्याला महापापादि पाप कधीहिं स्पर्श करीत नाही ||3|| जिकडे श्रीगीताचे ग्रंथ आहे आणि जिकडे श्रीगीतेचा नित्य पाठ होतो, तितेच प्रयागादि सर्व तीर्थ निवास करीतात ||4|| सर्व देव, ऋषि ,योगीगण, नाग आणि गोपालबाल श्रीकृष्ण ,नारद ,ध्रुव आणि सर्व पार्षदान सोबत लवकरच सहायक होतात ,जिकडे श्रीगीता (सदैव) प्रर्वतमान आहे ||5|| जिकडे श्रीगीतेचा विचार, पाठ, पठन आणि श्रवण होतो ,हे पृथ्वी (देवी) ! तिकडे मी निश्चितच (श्रीलक्ष्मी सोबत) निवास करतो ||6|| मी श्रीगीताचे आश्रयात राहतो, श्रीगीता माझे उत्तम घर आहे आणि श्रीगीतेचा आश्रय घेवूनच मी हे तिन्ही लोकांचे पालन-पोषण करतो ||7|| श्रीगीता अति अर्वणीय पदावली ,अविनाशी, (सम्पुर्ण वेद) अर्थमात्र आणि अक्षर स्वरूप , नित्य , ब्रह्मस्वरूपीनी, परम श्रेष्ठ माझी विद्या आहे याच्यात काही शंका नाही ||8|| श्रीगीता चिदानंद श्रीकृष्ण यांच्या मुखातून अर्जुनाला सांगितले गेलेले आणि तिन्ही वेद (फल) स्वरूप , परमानंद

स्वरूप आणि (सत्-असत्) तत्वस्वरूप पदार्थांच्या ज्ञानानी युक्त आहे ||9|| जो माणूस मनाला स्थिर करणारा होऊन नित्य श्रीगीताचे १८ अध्ययांचा जप पाठ करतो ,तो ज्ञानस्थ सिद्धीला प्राप्त करतो आणि नंतर परम पदाला (वैकुण्ठ धामाला) प्राप्त करतो ||10|| जो संपूर्ण श्रीगीताचे पाठ करण्यात असमर्थ असेल, अर्ध पाठ केले तरी गायला दान केल्याणे जो पुण्य प्राप्त होतो ,त्याला तो प्राप्त करतो, यात काही शंका नाही ||11|| जो तीसऱ्या भागाचा पाठ करतो तो गंगा स्नानाचा फल प्राप्त करतो आणि जो सहावे भागाचा पाठ करतो तो सोमयागचा फल लाभतो ||12|| जो माणूस भक्तियुक्त होऊन नित्य एक अध्यायाचा जरी पाठ करीत असेल तरी तो रूद्र लोकाला प्राप्त होतो आणि शिवगण बनून चिरकाल (महाप्रलय) पर्यंत निवास करतो ||13|| हे पृथ्वी ! जो नेह्मी एक अध्याय एक श्लोक व एक चरणाचा जरी पाठ करीत असतो, तो मन्वंतर पर्यंत मनुष्य (तत्व) जन्म प्राप्त करतो ||14|| जो माणूस श्रीगीताचे दाह, सात ,पाच, तीन,दोन आणि एक व अर्धा श्लेकाचा नित्य पाठ करतो तो निश्चित दाह हजार वर्ष पर्यंत चन्द्रलोकाला प्राप्त होतो आणि गीतेच्या पाठात रत माणसाचा मृत्यु झाला तर तो (पशु-पक्षीच्या योनीत न जाता) पुन: मनुष्य जन्म प्राप्त करतो ||15|| गीताचे पुन: पुन्हा अभ्यास करून उत्तम मुक्ति प्राप्त करतो आणि “गीता” असे उच्चारण करत जो मरण पावतो तो सदगति (कृष्ण धाम) मिळवतो ||16|| गीताचे अर्थांचे श्रवणात आसक्त असलेला महापापी असला तरी तो वैकुण्ठ लोकाला प्राप्त होतो आणि विष्णु सोबत (कायमचा) परम आनंद मिळवतो ||7|| सर्व कर्म करीत नित्य श्रीगीताचे अर्थांचा जो विचार करतो, त्याला जीवंतच मुक्त समझ . मृत्यु नंतर तो (कृष्ण धाम) परम पदला प्राप्त करतो ||18|| गीताचे आश्रय घेत (सीता मातेच्ये वडील राजा) जनक आणि कितऐक राजा पापमुक्त होऊन या

भुलोकात यशस्वी झालेत आणि परम पदालाही प्राप्त केले आहेत ||19|| श्रीगीताचे पाठ करून जो महात्मयचा पाठ करत नाही ,त्याचा पाठ निष्फल होतो. असे पाठाला श्रमरूप म्हटले गेले आहे ||20|| जो या गीताचे महात्मय सोबत श्रीगीताचे पाठ करतो ,तो त्यांचे फल प्राप्त करतो आणि नंतर दूर्लभ गतिची प्राप्ती करतो ||21||

## सूत म्हणाले

श्रीगीताचे महात्मयेला मी सांगितला, गीता पाठाचे शेवटी (महात्मयेला) याला जो पाठ करतो तो वर सांगितलेले फल प्राप्त करतो ||22||

*****************************************************

# ☀ श्रीमद्भगवद् गीता महात्मय ☀
## (भाग-२)

---

## शौनक ऋषि म्हणाले

हे सूता ! अति पूर्वकालातले मुनि श्रीवेदव्यासानी सांगितलेले श्रृतिमध्ये वर्णित श्रीगीता माहात्म्य ते मला कसेहि प्रकारे सांगा ||1||

## सूत म्हणाले

आपण जे प्राचीन आणि उत्तम श्रीगीता माहात्म्य विचारले आहें, ते अतिशय गुप्त आहें| म्हणजे ते सांगायला कोणीहि समर्थ नाहीं ||2|| गीताचे माहात्म्य श्रीकृष्णलाच संपूर्ण माहित आहें, थोडा अर्जुनाला माहित आहें तसेच शुकदेव, याज्ञवल्क्य , जनकादिला थोडाफार माहित आहें ||3|| अन्य लोक दुसऱ्यांकडून श्रवण करून लोकांच्या संगतित त्याचे कीर्तन करतात | म्हणून श्रीवेद व्यासांच्या मुखातून मी जे काही ऐकले आहें ते आता मी तूला सांगतो ||4|| जी ओपओप श्रीविष्णु भगवंताच्या मुखातून बाहेर पडली ,ती गीता (माणसाला) चांगल्या प्रकारे कण्ठस्थ कले पाहिजे | अन्य शास्त्रांचे संग्रह करून कुठले लाभ होणार आहें? ||5|| गीता धर्ममय, सर्वज्ञानाचे परमलक्ष्य आणि सर्व शास्त्रांनी परिपूर्ण आहें, म्हणून श्रीगीता श्रेष्ठ (व विशेष) आहें ||6|| जो माणूस या घोर (दुखरूपी) संसार सागराला पार करू इच्छीतो ,त्याला गीतारूपी नावेत चडून सुखपूर्वक पार केला पाहिजे ||7|| जो माणूस या पवित्र गीताशास्त्राचे सावध राहून नित्य पाठ करतो, तो निश्चित भय, शोक आदि पासून रहित होऊन श्रीविष्णुपदाची (कृष्ण धामाची) प्राप्ति करतो ||8|| जो सदैव योग-अभ्यासात रत आहे, गीताचे ज्ञान ऐकले नाहीं आणि तरी तो मोक्ष प्राप्तीची

इच्छा ठेवतो, तो मूढात्मा, बाल प्रमाणे हास्याचे पात्र होतो ||9|| जो रात्रन-दिवस गीता शास्त्राचे पाठ करतो व श्रवण करतो, तो मनुष्य नाहीं, त्याला तू देवच समझ, ह्याच्यात काही शंका नाहीं ||10|| प्रतिदिन मनुष्य पाण्याने स्नान करून स्वच्छ होत अलेस, परंतु जर एखाघाने एकदा सुद्धा पवित्र जलरूपी भगवद्गीतेमध्ये स्थान केले, तर त्याची भौतिक जीवनाची मलिनता पूर्णपणे नष्ट होऊन जातात ||11|| जो माणूस स्वत:हून गीताचे पाठ व श्रवण करणें हे जाणत नाहीं. ज्याने दुसऱ्याकडून श्रवण सुद्धा केला नाहीं | ज्याला गीताचे ज्ञान नाहीं, श्रद्धा नाहीं व भावना ही नाहीं ||12|| तो मनुष्य लोकात भटकट राहणारे डुकरा (शुकर प्राणी) सारखा आहें. त्याच्यापेक्षा अधम (नीच) दुसरा कोणी माणूस नाहीं, कारण तो श्रीगीताचे ज्ञानाला जाणत नाहीं ||13|| जो गीताचे अर्थांचे पाठ करत नाहीं. त्याचे ज्ञानाला, आचाराला, व्रताला, चेष्टाला, तपाला आणि यशाला धिक्कार आहें | त्याच्यापेक्षा अधम (पापी) अन्य कोणी मनुष्य नाहीं ||14|| जो ज्ञान गीतामध्ये गायलेला नाहीं, तो ज्ञान वेद आणि वेदांतात निंदनीय आहें म्हणुन तो ज्ञान निष्फल, धर्मरहित आणि आसूरीक आहें असे तू जाण ||15|| जो माणूस रात्रण-दिवस, झोपेत, चालता, बोलता आणि ऊभे राहता गीताचे यथार्थ सतत ध्यान करतो, तो सनातन मोक्षाची प्राप्ती करतो ||16|| योगीयांचे स्थानी, सिध्दगणांचे स्थानी, श्रेष्ठ पुरूषांचे समोर, संतसभेत, यज्ञस्थानी आणि विष्णुभक्तांचे समोर गीताचे पाठ करणारा व्यक्ति परम गतीची (श्रीकृष्ण चे निवास स्थान) प्राप्ती करतो ||17|| जो रोज गीताचे पाठ आणि श्रवण करतो, त्यानीच दक्षिणा सोबत अश्वमेध आदि सर्व यज्ञ केले आहेत ,असे म्हटल जाते ||18|| ज्यांनी भक्तीभावानी एकाग्र चित्त करून गीताचे अध्ययन केले आहे, त्यानीच सर्व वेदांचे, शास्त्रांचे आणि पुराणांचे अभ्यास केले आहे ,असे म्हटल जाते

||19|| जो माणूस स्वत: गीताचे अर्थांचे श्रवण करतो, गातो व परोपकार हेतु (लोकांना) सांगतो तो परम पदाची प्राप्ती करतो ||20|| ज्यांच्या घरात श्रीगीताचे पूजन होते, तीथेच (आध्यात्मिक, आधिदैविक आणि अधिभौतिक) तीन तापा (रोगा) पासून उत्पन्न होणारी पीडा व व्याधी येत नाही ||21|| जिकडे सतत गीताचे अभिनंदन होते , तिकडेच श्रीभगवान (विष्णु) परमेश्वरा मध्ये एकनिष्ठ भक्ती उत्पन्न होते ||23|| आंघोल केली , नाही केली, पवित्र असों की अपवित्र असो, पण जो व्यक्ती परमेश्वराचे आणि विश्वरूपाचे (अध्याय 11 चे) नित्य स्मरण (पाठ) करतो , तो सर्वदा पवित्र आहें ||24|| सर्व स्थानी जेवन करणारा आणि सर्व प्रकारे दान ग्रहण करणारा जरी गीताचे पाठ करत असला, तरी तो कधीच (कर्मफलांनी) लिप्त होत नाही ||25|| ज्याचे चित्त नेह्मी श्रीगीतामध्ये रमण करीत असते, तोच सम्पूर्ण अग्नीहोत्र इत्यादि यज्ञ, नित्य जप करणारा, (वैदिक) क्रिया करणारा आणि पण्डित आहे ||26|| तोच दर्शन करणें योग्य, धनी, योगी, ज्ञानी ,याज्ञिक, ध्यान करणारा आणि सर्व वेदांचे अर्थ जाणणारा आहे ||27|| जिकडे गीता ग्रंथाचे नित्य पाठ होत असते , तिथेच पृथ्वीवरचे प्रयागादि सर्व तीर्थ निवास करतात ||28|| तसेच त्यांचे घरात व देहरूपी देशात सर्व देवगण, ऋषिगण, योगीजणांचे आणि सर्पांचे नित्य निवास असते ||29|| गीता, गंगा, गायत्री, सीता, सत्या, सरस्वती, ब्रह्मविद्या, ब्रह्मवल्ली, त्रिसंध्या, मुक्तगेहिनी ||30|| अर्थमात्रा ,चिदानंद, भवघ्नी, भयनाशिनी, वेदत्रयी, परा, अनंता आणि तत्वार्थ ज्ञानमंजरी (तत्वरूपी अर्थाचे व ज्ञानाचे भंडार) ||31|| याप्रकारे (गीताचे गुणरूपी) अठरा नावांचे जो स्थिर मनाचे द्वारा नित्य जप करतो, तो लवकरच ज्ञानसिध्दि आणि मृत्युनंतर परम पदाला (श्रीकृष्ण धाम) प्राप्त करतो ||32|| माणूस जसै कसै कर्म करीत असतो, जर तो त्यासोबत गीतापाठ चालू ठेवतो, तर

तो सर्व कर्म निर्दोषितापणे पुर्ण करून त्याचे फल प्राप्त करतो ||33|| जो माणूस श्राद्धमध्ये पितरांना लक्ष्य करून गीताचे पाठ करतो, त्याचे पितृ संतुष्ट होऊण नरकातून सदगति मिळवतात ||34|| गीतापाठ करून प्रसन्न व श्राद्ध करून तृप्त झालेले पितृगण नंतर आपल्या पुत्राला आशीर्वाद देणे हेतू पितृलोकात जातात ||35|| जो माणूस गीताचे लिखान गल्यात , हाताथ, व मस्तकावर धारूण करतो. त्याचे सर्व विघ्नरूप दारूण उपद्रवांचे नाश होते ||36|| भरतखण्डात जो चार (प्रकारचे) मनुष्य वर्गाचे (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य (व्याणिज्य , व्यापारी, क्षेतकरी), क्षुद्र (नौकरशाही) देह प्राप्त करून, जो अमृतस्वरूप गीताचे पाठ करत नाही व श्रवण सुद्धा करत नाही ||37|| तो हाथात आलेले अमृत (कलश) सोडूण कष्ट करून विषच खात असतो, पण जो माणूस श्रीगीताचे नित्य पाठ , श्रवण करतो, तो ह्या लोकात गीतारूपी अमृताचे पान करून नंतर तो मोक्ष प्राप्त करून (कायमचा) सुखी होतो ||38|| संसाराचे दुखांनी त्रस्त झालेले ज्या माणसानी (गीताचे) ज्ञान ऐक्ले आहे, त्यानीच अमृत प्राप्त केला आहे आणि त्यानीच श्रीहरि धामाची प्राप्ति केली आहे ||39|| ह्या लोकात जनकादि सारखे किती राजा या श्रीगीताचे आश्रय घेऊन आणि पापरहित होऊन परम पदाची प्राप्ति केली आहे ||40|| गीतामध्ये उच्च आणि नीच (दर्जेचे) माणसाच्यात विषया बदल काहीच भेद नाही आहे, कारण गीता ब्रह्मस्वरूप आहे, म्हणून त्याचे ज्ञान सर्वांसाठी सारखे आहे ||41|| गीताच्ये अर्थाला परम आदरभावानी ऐकूण जो आनंदित होत नाही, तो माणूस प्रमादच्या कारणस्वरूप ह्या लोकात तो (आध्यात्मिक कर्म) फल प्राप्त करत नाही ,तर तो व्यर्थ श्रम करीत (जगत) असतो ||42|| गीताचे पाठ करून जो माहात्म्यच्ये पाठ करत नाही, त्याचे गीतापाठ व्यर्थ होते आणि त्याचे पाठ केवल श्रमरूपच राहूण जाते ||43|| वर सांगितलेले माहात्म्य

सोबत जो गीताचे पाठ करतो, व श्रद्धापूर्वक ऐकतो तो दुर्लभ गतिची (श्रीकृष्ण धामाची) प्राप्ती करतो ||44|| गीताचे सनातन (शाश्वत) माहात्म्य मी सांगितला आहे, जो गीतापाठाचे शेवटी माहात्म्यचा जो पाठ करतो तो वर सांगितलेले फल प्राप्त करतो ||45||

---

**"श्रीलक्ष्मी भगवान विष्णुच्या नियंत्रणा खाली कार्य करीत असते, अज्ञानी ,मुढ लोक लक्ष्मी माझी व माझ्या नियंत्रणात आहे असे म्हणतात , तरी ते दुखी असतात॥"**

---

## ज्ञानेश्वरी गीता महात्मय

गीताकथा ती सुंदर | प्रकटली रणभूमीवर | करण्या जगाचा उध्दार ||32|| अजून ऐका गोष्ट एक | गीता परम ज्ञान सात्विक | आत्मतत्वाचा सुवास | गीते कारणे संपता भ्रम अज्ञान | होतसे बोधाचे प्रकटन | संपतसे ते जन्ममरण ||35|| कलांना येते कौशल्यता | पुण्य ते वाढता | घडली ऋषि जनमेजयाचे दोषांशी मुक्तता ||37|| जसे सूर्यबिंबच प्रकटले | त्रैलोक्य पहा उजळले | तैसे व्यासानी प्रकटविले | गीता तत्व सुपीक जमिनीत बी पेरता | प्रकटते ती धनधान्यता | तैसे फुलली ही गीता ||39||

---

**" नित्य ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ मंत्र लिहा धंन,संपत्ति आणि मोक्ष मिळवा "**

---

अध्याय १

# अर्जुनविषाद योग

---

## (राजा) धृतराष्ट्र म्हणाला

हे संज्जया ! (पवित्र) धर्म क्षेत्रात व कुरूक्षेत्रात युद्धासाठी एकत्रित झालेले माझे पुत्रांनी आणि पाण्डू पुत्रांनी काय केले ? ||1||

## संज्जय म्हणाला

हे महाराज ! पांडवांची सैन्याला व्यूह रचनांमध्ये अवस्थित पाहून दुर्योधनाने द्रोणाचार्यांच्या जवळ जाऊन असे वचन म्हणाला ||2|| हे आचार्य ! तुमच्या (प्रिय) बुद्धीमान शिष्याने द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नाने व्यूहरचना करून उभी केलेली ही पांडु पुत्रांची प्रचंड सैन्याला पहा ||3|| या सैन्यात मोठं मोठी धनुष्य घेतलेले भीम, अर्जुना सारखे शूरवीर, सात्यकी, विराट, महारथी द्रुपद ||4|| धृष्टकेतू, चेकितान, बलवान, काशिराज, पुरूजित, कुन्तिभोज, नरश्रेष्ठ शैब्य ,पराक्रमी युधामन्यू ||5|| तसेच अत्यंत शक्तिशाली उत्तमौजा, (श्रीकृष्ण-बलरामाची बहीण) सुभद्रा पुत्र अभिमन्यू आणि द्रौपदीचे पाच पुत्र हे सर्वच महारथी आहेत ||6|| परंतु हे ब्राह्मण श्रेष्ठा (द्रोणाचार्य) ! आपले जे विशिष्ट बलशाली (योद्धा) आहेत त्या सर्वांना जाणून घ्या आणि माझ्या सैन्याचे जे सेनापति आहेत ,ते मी तुम्हाला सांगतो ||7|| आपण द्रोणाचार्य, पितामह, भीष्म, कर्ण, युद्धात विजयी होणारे कृपाचार्य ,(द्रोणाचार्य पुत्र) अश्वथामा ,विकर्ण तसेच सोमदत्ताचा मुलगा भूरिश्रवा ||8|| इतरही पुष्कळ शूरवीर आहेत इथे जे माझ्यासाठी प्राण देण्यास तैय्यार असून. ते सर्वजण निरनिराळ्या शस्त्र-अस्त्रांनी सज्जित असून युद्ध कलेत पारंगत आहेत ||9|| भीष्म पिताम्हांनी रक्षण केलेले आपले हे सैन्यबल सर्व दृष्टीने अपरिपूर्ण दिसत आहे; तर भीमाने रक्षण केलेले सैन्यबल परिपूर्ण (सीमित) दिसत

आहे ||10|| म्हणून सर्व व्यूहाच्या प्रवेश द्वारात आप-आपल्या जागेवर राहून आपण सर्वांनीच नि:संदेह भीष्म-पितामहाचेच सर्व बाजूंनी रक्षण करावे. ||11|| असे ऐकून कौरवांतील वृध्द ,महापराक्रमी पितामह भीष्माने त्या दुर्योधनाचे अंत-करणात आनंद निर्माण करीत मोठ्याने सिंहासारखे गर्जना करून शंख वाजविला ||12|| त्यानंतर शंख, नगारे, ढोल, मृदङ्ग, शिंगे इत्यादि वाद्ये एकदम वाजू लागली आणि त्यांचा प्रचंड आवाज झाला ||13|| त्यानंतर पांढरे घोडे जोडलेल्या उत्तम रथात बसलेल्या श्रीकृष्णांनी आणि पांडुपुत्र अर्जुनाने दिव्य शंख वाजवले ||14||श्रीकृष्णानी पान्जन्य नावाचा आणि भयानक कृत्ये (कर्म) करणारे भीमाने पौण्ड्र नावाचा मोठा शंख फुंकीला ||15|| कुन्तीपुत्र राजा युधिष्ठर अनंतविजय, नकुल आणि सहदेव यांनी सुघोस आणि मनि पुष्पक ||16|| तसेच महांधनुर्धारी, महारथी शिखंडी आणि घृष्टधुम्न , विराट अजिंक्य सात्यकि ||17|| द्रुपद आणि द्रोपदीचे (पांच) मुलगे आणि महाबाहू (कृष्ण बलरामाची भगिनी) सुभद्रापुत्र (अभिमन्यु) या सर्वांनी हे राजन घुतराष्ट्र ! चोहोंकडे आप आपले शंख वाजविले ||18|| आकाश व पृथ्वी दणकावून सोडणाऱ्या त्या तंबुल (प्रचंड) आवाजाने कौरवांचे काळीज फाडून टाकले (असे ऐकून महाप्रलय आले की काय आकाशात देवगण सुद्धा घाबरून गेले) ||19|| महाराज ! त्यानंतर (लाल) ध्वजावर हनुमान असणाऱ्या रथात त्या अर्जुनाने युध्दाच्या तयारीने उभ्या असलेल्या त्या कौरवांना पाहून, धनुष्य हातात घेऊन युद्धासाठी सज्ज झाला ||20|| हे राजन (घृतराष्ट) ! तेव्हा अर्जुनाने हषीकेश श्रीकृष्णाला असे म्हणाला . हे अच्युता ! माझे रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी उभा करा ||21|| मी रणभूमीवर युद्धाच्या इच्छेने सज्ज झालेल्या या शत्रू पक्षांकडील योद्धायांचे मी अवलोकन करीतो, व मला रण - संग्रामांत कोणाबरोबर लढा वयाचे

आहे आणि ||22|| दुर्बुध्दि घृतराष्ट्र पुत्रांचे (दुर्योधनाचे) कल्याण करण्याच्या इच्छेने जे हे येथे सर्व लढणारे जमले आहेत , त्यांना मी पाहू इच्छीतो ||23||

## संजय म्हणाला

हे धृतराष्ट्रमहाराज ! अर्जुनाने असे सांगितल्यावर श्रीकृष्णांनी दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी सर्वोत्तम रथ उभा केला ||24|| भीष्म, द्रोणाचार्य व इतर सर्व जगातील राजांच्या उपस्थितित भगवान (अर्जुनला) असे म्हणाले हे पार्थ ! (युद्धासाठी) एकत्रित झालेले या सर्व कौरवांना पहा ||25|| त्यानंतर कुंतीपुत्र अर्जुनाने त्या दोन्ही सैन्यांमध्ये असलेल्या काका, आजे-पणजे, गुरू (द्रोण), मामा, भाऊ, मुलगे, नातू, मित्र, सासरे आणि हितचिंतक त्या सर्वांना पाहीले ||26|| तेथे जमलेल्या त्या सर्व बान्धवांना पाहून अत्यंत करूणेने व्याप्त झालेल्या कुन्तीपुत्र अर्जुनाने शोकाकुल होऊन म्हणाला ||27||

## अर्जुन म्हणाला

हे कृष्णा ! युध्दाच्या इच्छेने (येथे) उभ्या असलेल्या या सर्व स्वजनांना पाहून माझे अंग गळून जात आहेत ,तोंडाला कोरडे पडली आहे ||28|| शरीराला कंप सुटला आहे आणि अंगावर रोमांचही उभे राहत आहे. हातातून गाण्डीव धनुष्य गळून पडत आहे, अंगाचा दाह होत आहे ||29|| त्यामुळे मी उभा देखील राहू शकत नाही तसेच माझे मन भ्रमिष्टा सारखे झाले आहे. सर्वीकडे फक्त विपरीत (अशुभ) लक्षणे दिसत आहे ||30|| हे केशवा ! युद्धात स्वजनांना मारून माझे कल्याण होईल, असे मला दिसतही नाही. विजयाची इच्छा नाही, राज्य नको आणि सुखही नको ||31|| हे कृष्णा ! हे गोविंद ! असे राज्य भोग व जगण्याचे तरी काय लाभ आहे ? ज्यांच्यासाठी आम्ही राज्य भोग आणि सुखाची इच्छा करावी तेच हे सर्व रणांगणावर युद्धासाठी (माझ्या समोर) उभे राहले आहेत ||32|| ते

सर्व म्हणजे गुरूजन, काका, मुलगे ,आजे ,मामा, सासरे , नातू , मेहुणे , त्याच प्रमाणे इतर संबंधी स्वतःचे प्राण आणि (कुटुंब) धनाचा त्याग करण्यास तैय्यार असून तें सर्वजण युद्धासाठी माझ्या समोर उभे आहेत ||33|| म्हणून हे मधुसूदना ! या लोकांनी माझे वध जरी कले , तरी देखील मी त्यांचे हत्या करू इच्छित नाही ||34|| हे जनार्दना ! या पृथ्वी बदल काय म्हणायचा ? त्रैलोक्याच्या राज्यांसाठी सुद्धा घृतराष्ट्र पुत्रांचा वध करून आम्हाला तरी कुठले आनंद मिळणार आहे? ||35|| हे जनार्दना ! या सर्व आक्रमणांना मारून आम्हाला (पाडंवाना) शेवटी पापच लागणार. आपल्या बांधवाना धृतराष्ट्रपुत्रांना आम्ही मारणे योग्य नाही. कारण आपल्या कुटुंबियांना मारून आम्ही तरी कसे सुखी होणार? ||36|| जरी त्यांचे ह्रदय लोभाने व्याप्त असलेले या लोकांना आपल्या कुळाचा क्षय करणार दोषांचा आणि मित्रांशी वैर करण्याचे पातक दिसत नसले तरी ||37|| हे जनार्दना ! कुलक्षयाचा दोष स्पष्ट दिसत असतानाही आम्ही या पापापासून परावृत्त होण्याचा विचार का बरे करू नये ? ||38|| कारण कुळाचा क्षय (नाश) झाला म्हणजे परंपरागत कुलधर्म नष्ट होतो आणि त्या कुळांचे धर्म सुटले म्हणजे सर्व कुळांवर अधर्माचा पगडा बसतो ||39|| अधर्म माजला म्हणजे हे कृष्णा ! कुलातील स्त्रिया (भ्रष्ट) बिघडतात ; बिघडल्या म्हणजे हे वाष्णेया ! वर्ण व्यवस्थेचा नाश होतो ||40|| आणि वर्णसंकर झाला म्हणजे तो कुळ घातक आणि सर्व कुटुंबियांना निश्चय करून नरकात नेतो.कारण पिंड दान-तर्पणा इत्यादि क्रिया लुप्त झाल्यामुळे त्यांचे पितर अधोगतिला म्हणजे नरकात जातात ||41|| या वर्णसंकर करणारे दोषामुळे परंपरागत जाति धर्म आणि कुळधर्म उध्वस्त होऊन जातात ||42|| हे जनार्दना ! ज्यांचे कुळधर्म नाहीसे झाले आहेत, अशा माणसांना अनिश्चित काळापर्यंत नरकात पडावे लागते, असे

आम्ही ऐकत आलो आहे ||43|| अरेरे ! किती खेदाची गोष्ट आहे ! आम्ही बुद्धीमान असून सुद्धा राज्य आणि सुखाच्या लोभाने कुटुंबियांना मारायला तैय्यार झालो, हे केवढे मोठे पाप मी करायला उद्युक्त झालो बरे ! ||44|| जर शस्त्ररहित व आत्मन रक्षणासाठी अप्रतिकार करीत मला हातात शस्त्र घेतलेल्या धृतराष्ट्र-पुत्रांनी रणात ठार जरी मारले, तरी ते मला अधिक कल्याण कारक ठरेल ||45||

## संजय म्हणाला

रणभूमीवर दु:खाने उद्विग्न मन झालेल्या त्या अर्जुनाने एवढे बोलूण बाणासह धनुष्य टाकून देऊन शोकाकुल होऊन रथाच्या मागे जाऊन आसनावर बसला ||46||

# ---( समाप्त )---

# साख्य योग

---

## संजय म्हणाला

अशा रीतीने करूणेने व्याप्त, ज्याचे डोळे आसवांनी भरलेले व व्याकुळ दिसत आहेत, अशा शोक करणारा अर्जुनाला भगवान मधुसूदन (मधु नावाचे दैत्याचा वध करणारा) असे वचन म्हणाला ||1||

## श्रीभगवान म्हणाले

हे अर्जुना ! कोठून हा अशुद्ध (विचार) शोक (घोर) संकटाच्या वेळी तुझ्या समोर उपस्थित झाला ? कारण हे श्रेष्ठ पुरूषांनी (ज्याला जीवनाचे मुल्य माहित आहे) न आचरलेला ,स्वर्ग मिळून न देणारा आणि दुष्कीर्तिलाही कारणीभूत आहे ||2|| म्हणून हे परन्तपा ! षंढपणा (नपुंसक्तव) पत्करू नको ,हे तुला शोभत नाही, हे परंतपा ! अंत: करणाचे तुच्छ दुबळेपण सोडून देऊन तू उठ (युद्धाला उभा रहा) ||3||अर्जुनाचे वैराग्य||

## अर्जुन म्हणाला

हे मधुसुदना ! युध्दात मी भीष्म पितामह (प्रिय आजोबा) आणि द्रोणाचार्य यांच्या (प्रिय गुरू) विरूद्ध बाणांनी कसा लढू ? कारण हे मधुसुदना ! ते दोघंही माझ्यासाठी पूजनीय आहेत, हे अरिसूदना ! ||4|| गुरूजनांना न मारता जे की महानुभवी आहेत ,ह्या जगात भिक्षा मागून खाणेही कल्याण कारक आहे ,कारण भौतिक इच्छेने गुरूजनांना मारून निश्चित कामरूपी अर्थ व भोग भोगावे लागणार जे की त्यांच्या रक्ताने माखलेले असतील ||5|| युद्धात आम्ही जिंकणार व ते आम्हाला जिंकतील या मध्ये काय श्रेष्ठ आहे ? मला समजत नाही. ज्यांना मारून

आम्हाला जगण्याची ही इच्छा नाही, तेच आमचे बांधव-धृतराष्ट्रपुत्र (युद्धासाठी) समोर उभे आहेत ||6|| अर्जुनाचा श्रीकृष्णरूपी गुरूचा स्वीकार || करुणानी व्याप्त ज्याचे मूळ (क्षत्रिय) स्वभाव नाहीसा झाला आहे व धर्म-अधर्माचा निर्णय करण्या विषयी ज्याची बुद्धी असमर्थ आहे ,असे मी तुम्हाला विचारीत आहे की, जे साधन खात्रीने कल्याण कारक आहे ते मला सांगा, मी तुमचा शिष्य आहे तुमच्या शरणात आलो आहे, कृपया मला उपदेश करा ||7|| कारण ,पृथ्वी जवळ आणि धन-धान्यादि समृद्ध राज्य मिळाले किंवा देवतांचे (स्वर्गाचे) स्वामित्व जरी मिळाले तरी या शोकाला जो दूर करू शकेल, असा उपाय मला दिसतही नाही ||8||

## संजय म्हणाला

हे राजन धृतराष्ट्र ! (ज्याने महादेव शंकराशी ही युद्ध केले आणि निद्रेवर ताबा ठेवणारा) अर्जुनने अंतर्यामी श्रीकृष्णाला एवढे बोलून "मी युद्ध करणार नाही , हे गोविंद " असे स्पष्टपणे म्हणून तो गप्प झाला ||9|| हे भरतवंशी धृतराष्ट्र महाराज ! अंतर्यामी भगवान श्रीकृष्ण दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी खिन्न होऊन बसलेल्या त्या अर्जनास हसल्यासारखे तोंड करून असे वचन म्हणाले ||10||

## श्रीभगवान म्हणाले

हे अर्जुना ! ज्या वस्तुंचे (लोकचं) विचार करणे योग्य नाही, असे वस्तुंसाठी तू शोक करतोस आणि विद्वाना प्रमाणे बोलतोस ही. परंतु ज्यांचे प्राण आहेत आणि ज्यांचे प्राण गेले (मृत झाले) आहेत ,त्यांच्यासाठी पण्डितगण सुद्धा शोक (व चिंता) करत नाही ||11|| मी (कृष्ण) कोणत्याही काळी नव्हतो, तू (अर्जुन) नव्हतास , ना हे राजा-प्रजा होती व न असे (युद्ध ) कधी झाले होते आणि या पुढे भविष्यमध्ये आपण सर्वजण

नसणार ,असेही नाही ||12|| आत्मा व शरीर (सांख्यज्ञान) जसे शरीरधारी जीवात्माच्या स्थूल शरीरात क्रमांकाने बालपण, तारूण्य आणि म्हातारापण येतो. त्याच प्रमाणे (स्थूल शरीरचे मृत्यु झाल्यावर) आत्म्याला सुद्धा दुसरे नवीन देह (व शरीर) मिळत असतात, या विषयी धीर व्यक्तींचे मनात मोह उत्पन्न होत नाही ||13|| हे कुन्तीपुत्रा ! इंद्रियांचे स्वभावात विषयांशी संयोग हे शीत -उष्ण, सुख-दुःख देणारे आहेत, ते उत्पन्न होतात व नाहीसे ही होतात, म्हणून ते सर्व भास नष्ट होणारी आणि अनित्य (रेणारे-जाणारे) आहेत. तेव्हा हे भारता ! क्षुब्ध न होता मनुष्याने ते सर्व सहन करण्यास शिकले पाहिजे ||14|| कारण हे श्रेष्ठ पुरूषा ! जो विषयांनी व्यथित होत नाही, ज्याला सुख व दुःख सारखीच ,क्षणभंगुर व उपेक्षणीय वाटतात, व जो धैर्य सोडीत नाही, तोच खात्रीने अमृतत्व घेण्यास (मोक्षाला) योग्य होतो ||15|| नाही “असत” वस्तुची (सुखÐदुःख ,भौतिक शरीराची) सत्ता (स्थिर) आहे (ज्यामध्ये नेहमी बदल होत असते) नाही “सत्” (आत्मा) चा नाश आहे. अशा रीतीने या दोन्ही सत्य स्वरुपाला तत्त्वज्ञानी (आत्मसाक्षातकारी) पुरूषांनी तर्क-वितर्क करून असा निष्कर्ष काढला आहे ||16|| पण, ज्याने हे संपूर्ण शरीर व जग व्यापले आहे, तो अविनाशी आहे. हे लक्षात ठेव, त्या अविनाशी (आत्मा) तत्वाचा नाश करण्यास कोणीही (मी सुद्धा) समर्थ नाही ||17|| हे अर्जुना ! (तू जीवात्मा आहेस) हा (आत्मा) नाशरहित, मोजता न येणारा (अणुपेक्षाही सूक्ष्म), नित्यस्वरूप आणि सनातन म्हणजे शाश्वत आहे, जीवात्माला प्राप्त होणारे सर्व भौतिक शरीर नाशवंत आहेत ,असे म्हटले गेले आहेत ,म्हणून हे भरतवंशी अर्जुना ! तू युद्ध कर ||18|| जो हा आत्मा मरणार व मारणारा असे मानतो, ते दोघंही अज्ञानात आहेत. कारण आत्मा वास्तविक पाहता कोणाला मारतही नाही आणि

कोणाकडून मारलाही जात नाही ||19|| आत्मगुण व स्वरूप || हा आत्मा कधीही जन्म घेत नाही आणि मरतही नाही, तसेच हा एकदा उत्पन्न झाल्यावर पुन: उत्पन्न (व त्यात वृद्धि) होणारा नाही. कारण हा अजन्मा (जन्म नसलेला), नित्य, शाश्वत आणि प्राचीन आहे .शरीर मारला गेला तरी हा मारला जात नाही ||20|| हे पार्थ ! जो हा आत्मा नाशरहित, नित्य, अव्यय (सूक्ष्म, अप्रकट) आणि अविनाशी जाणतो ,तो कोणाला कसा मारणार ? किंवा तो (आत्मा) कोणाला कसा मारून घेणार ? ||21|| ज्याप्रमाणे एखादा माणूस जुनी वस्त्रे टाकून देऊन दुसरे नवीन वस्त्रे धारण करतो (शोक करत नाही), त्याच प्रमाणे जीवात्मा जुने शरीर टाकून दुसरे नवीन (वेगळे प्रकारचे) शरीर निश्चित धारण करतो ||22|| या आत्म्याला शस्त्र कापू शक्त नाही, अग्नी जाळू शक्त नाही, पाणी भिजवू शकत नाही, आणि वारा सुद्धा वाळवू शकत नाही ||23|| हा जीवात्मा न तुटणारा तसेच त्याला जाळणे , भिजवणे आणि (वाऱ्याने) वाळवणे ही शक्य नाहीं. हा जीवात्मा नित्य (सदैव रहाणारा) ,सर्वव्यापी ,अचल ,स्थिर राहणारा ,सर्वांत प्राचीन आणि सनातन (शाश्वत) आहे ||24|| हा आत्मा अव्यक्त (अप्रकट) आहे ,अचिंत्य (मनानेही जाणणे अशक्य) आहे आणि विकाररहित (कुठल्याही दोषाची उपाधी नाही) व अत्यंत शुध्द (पवित्र, पापमुक्त) आहे असे म्हटले जाते, म्हणून हे अर्जुना ! हा आत्मा वर सांगितल्या प्रमाणे आहे ,हे लक्षात घेऊन तुला शोक करणे योग्य नाही ||25|| अथवा हा आत्मा (शरीर बरोबर) नेहमी जन्मतो किंवा नेहमी मरतो, असे जर तू मानत अशील तरी सुद्धा हे महाबाहो ! मग तर शोक करणे उचितच नाही ||26|| कारण जो जन्म घेतो त्याचा मृत्यू निश्चित आहे आणि ज्याचा मृत्यू झाला आहे त्याचा जन्म निश्चित आहे, म्हणून तुझ्या अपरिहार्य कर्तव्याबदल तुला शोक करणे योग्य (आवश्यकता) नाही

**||27|| सर्वभूते (जीव) आरंभी व जन्मापूर्वी अव्यक्त (अप्रकट) असतात, (जन्म आणि मृत्यूच्या) मध्ये प्रकट (दिसत) असतात आणि मृत्यूनंतर ते पुन: अवयक्त (अदृश्य ) होतात, मग त्यांच्यासाठी शोक कशाला ? ||28|| एखादा महापुरूष या आत्म्येला आश्चर्य प्रमाणे पाहतो ,तर कोणी तत्वाज्ञानाने आश्चर्य प्रमाणे वर्णन करतो, कोणी यांच्याविषयी आश्चर्य प्रमाणे ऐकत असतो आणि कोणी कोणी तर ऐकूनही त्याला जाणत नाहीत.||29|| हे भरतवंशी अर्जुना ! हा आत्मा सर्वांच्या शरीरात नेहमीच अवध्य (वध न होणारा) असतो ,म्हणून कोणत्याही प्राण्यांच्या बाबतीत तुला शोक करणे योग्य नाही ||30|| तसेच स्वतःच्या धर्म लक्षात घेऊन तू भिंता कामा नये. कारण क्षत्रियाला ,स्वधर्म युद्धापेक्षा दुसरे कोणतेही कल्याणकारक कर्तव्य कर्म नाही ||31|| हे पार्थ ! सहजपणे समोर आलेले व उघडलेले स्वर्गाचे दारच असे हे युद्ध भाग्यवान क्षत्रियांना लाभतो ||32|| परंतु जर तू हे धर्मयुक्त युद्ध केलेस नाही तर स्वधर्म (धार्मिक कर्तव्यकर्म) आणि कीर्ति गमावून पापाला प्राप्त करशील ||33|| तसेच सर्व लोक तुझी चिरकाल अपकीर्ति सांगत राहतील आणि सम्मानित व्यक्तीला दुष्कीर्ति मरणापेक्षा अधिक भयंकर (त्रासदायक) मरण आहे ||34|| दुर्योधना सोबत दुसरे महारथी सर्व तुला "भिऊन युद्धातून पळून जाणारा" समजतील आणि ज्याचे जवळ तू आदी जास्त वेळ अतिशय आदरणीय होतास, आता ते पण तुला तुच्छ मानतील ||35|| तुझे शत्रू तुझ्या सामर्थ्याची निंदा (थू थू) करीत तुला नको नको ते बोलतील ,याहून अधिक दुःख दायक काय असणार आहे? ||36|| अरे ,रणात विजयी झालास तर पृथ्वीचे राज्य भोगशील हे तर निश्चितच, मरण पावलास तर स्वर्गात जाशील, अत: निश्चयी होऊन तू युद्धासाठी उभा हो ||37|| जय-पराजय ,लाभ-नुकसान आणि सुख-दु:खाला समान मानून युद्ध कर. अशा रीतीने कर्तव्य कर्म**

केल्याने तुला कोणतेचं पाप लागणार नाही ||38|| निष्काम कर्मयोग हे पार्थ ! हा विचार तुला सांख्य (सत्–असत सर्व गोष्टींचे) संदर्भात सांगीतला आणि आता बुद्धीयोगा विषयी ज्ञान ऐक. कारण या बुद्धीने युक्त झाला असता तू सर्व (संसार) कर्मबंधनातून (कायमचा) मुक्त होशील ||39|| या (निष्काम कर्म) योग्यात केलेला प्रयास कधीच विफल होत नाही आणि उलट केल्यास फलस्वरूप दोषही लागत नाही. या धर्म मार्गाचे पुष्कळ आचरण केलेस जरी,तू (दुखरूपी संसाराच्या) फार मोठ्या भयापासून मुक्त होशील ||40|| हे अर्जुना ! या योगात निश्चयात्मक बुद्धी ऐकच ,परंतु अस्थिर असणाऱ्या, अविचारी, कामनायुक्त माणसांच्या बुद्धी खात्रीने पुष्कळ फाटे फुटलेल्या वृक्षाच्या असंख्य शाखांप्रमाणे असतात (जे की बुद्धिला अनिश्चित करतात) ||41|| हे अर्जुना ! मूर्ख लोक वेदांचे अर्थ वाक्य विषय फलस्वरूप मधुपुष्पित वाक्याला प्रकृष्ट वेद वाक्य म्हणतात. असे वेद अर्थांमध्येच रत "याहून श्रेष्ठ अन्य काहीच नाही" असे ते म्हणारे असतात (परमात्म तत्वाला मानत नाही) ||42|| अत: काम भोगानी दूषित त्यांचे मन ,व स्वर्ग प्राप्तीचे इच्छित पुरूष , चांगले जन्मरूपी कर्मफल देणारे त्या विविध (वेद वर्णित यज्ञ) क्रिया करून ते (इंद्रिय सुखरूप) भोग-ऐश्वर्याकडे प्रगती करतात ||43|| आणि जे प्राप्त झालेले भोगता व ऐश्वर्यात जे अत्यंत आसक्त आहेत ,अशा लोकांची निश्चयात्मक बुद्धी कधीही (परमात्म्यात) समाधिस्थ (स्थिर) होत नाही ||44|| हे अर्जुना ! वेदांतात (सत्व, रज व तम) सांगितलेले तिन्ही गुणांचा पूर्णपणे त्याग करूण निर्गुण (परमात्मा) तत्वामध्ये प्रतिष्ठित हो. तू सर्व द्वंद्वांनी (मान अपमानादि) रहित होऊन लाभ (धन-धाण्यादि) आणि रक्षणाची इच्छा न ठेवता, माझे सांगितले प्रमाणे बुद्धीयोगाद्वारा माझ्या नित्य स्वरुपात (भक्तीमध्ये) प्रतिष्ठित हो ||45|| जितके प्रयोजन लहान

जलाशयानी सिद्ध होतात, ते सर्व मोठ्या जलाशयानी सहज सिद्ध होतात. त्याच प्रमाणे सर्व वेदांतील प्रयोजन व सिद्धी (फल) परब्रह्माचे ज्ञान असणाऱ्या ब्राह्मणाला (भगवद् भक्तीने) सहजच प्राप्त होतात ,तोच पूर्ण ज्ञानी (संपूर्ण वेदांचे ज्ञानाला जाणणारा) आहे ||46|| तुला स्वतःचे शास्त्रधर्म युक्त कर्म करण्याचे अधिकार आहे. पण त्यांचे फलांवर कधीही नाही, म्हणून तू कर्मफलांची इच्छा करणारा व त्यांचे भोगात आसक्त होणारा होऊ नको ,तसेच कर्म न करण्याचाही आग्रह धरू नको ||47|| हे धंनञ्जया ! तू आसक्ति सोडून तसेच सिद्धी-असिद्धी मध्ये समान भाव ठेवून आणि योगात स्थिर होऊन कर्तव्य कर्म कर , यालाच समतत्व योग असे म्हटले आहे ||48|| या समतत्व बुद्धी योगापेक्षा सकाम (इच्छा ठेवून केलेले) कर्म अत्यंत तुच्छ (पुन: जन्म देणारे) आहेत, म्हणून हे धनंजया ! तू समबुद्धीच्या रक्षणाचा उपाय शोध (बुद्धी योग व निष्काम कर्मयोगाचें आश्रय घे) ,कारण फलांची इच्छा बाळगणारे लोक अत्यंत दीन लालच्या पायरीचे) होतात ||49|| कारण समबुध्दीयुक्त व्यक्ती ह्याच जगात पाप व पुण्य या दाहींपासून अलिप्त राहतो, म्हणुन तू या (समतत्वरूप) योगाचे आश्रय घे कारण तोच कर्म करण्याचा कौशल आहे (व त्यालाच कर्मयोग असे म्हणतात) ||50|| कारण समबुध्दीने युक्त असलेले ज्ञानी कर्मांपासून उत्पन्न होणारे फळांचा त्याग करून जन्मरूपी बंधनापासून मुक्त होऊन (जर फळच नाही तर ते भोगाला पुन: जन्म न घेत) निर्विकार ,दु:खरहित अशा परमात्म्येच्या नित्य पदाला (दिव्य स्थानाला) जाऊन पोहचतो ||51|| जेव्हा तुझी बुद्धी मोहरूपी चिखलाला पूर्णपणे पार करून जाईल, तेव्हा तू ऐकलेल्या व ऐकण्यासारखे (इह-परलोकातील सर्व भोगांदि) सर्व विषयांपासून तू विरक्त (उदासीन) होशील ||52|| तेच तेच वैदिक वचने ऐकून विचलित झालेली तुझी बुद्धी जेव्हा समाधीत

(परमात्म्यात) अचलपणे निश्चल (शांत) आणि स्थिर होईल ,तेव्हा तू योगफल प्राप्त करशील (परमात्म्याशी नित्य संयोग होईल) ||53||

स्थिरबुध्दी मनुष्यांची लक्षणे

## अर्जुनाने विचारले

हे केशवा ! समाधीत राहणारे स्थिर बुद्धी पुरूषांचे काय लक्षण आहेत ? तो स्थिरबुद्धी असलेला व्यक्ती कसा बसतो, कसा बोलतो, आणि कसा चालतो ? ||54||

## श्रीभगवान म्हणाले

हे अर्जुना ! ज्यावेळी एखादा व्यक्ती मनातले सर्व कामना पूर्णपणे टाकून देतो आणि निग्रह केलेल्या (संयमित) मनाने आनंदस्वरूप स्वतःचे आत्म्यातच संतुष्ट राहतो ,त्यालाच स्थितप्रज्ञ म्हटला जातो ||55|| दुख:दायक प्रसंगी ज्यांचे मनाला खेद वाटत नाही ,सुखांच्या प्राप्ती विषयी ज्याला मुळीच इच्छा नाही. तसेच ज्यांचे प्रीति (आवडी-निवडी),भय व क्रोध नाहीसे झाले आहेत ,असे मुनीला स्थिरबुध्दीचा म्हटला जातो ||56|| जो सर्व बाततीत (पदार्थात) मोहशुन्य आहे ,शुभ-अशुभ गोष्टी प्राप्त झाल्या असता प्रसन्न होत नाही किंवा त्यांचा द्वेष सुद्धा करत नाही, त्यांचीच बुद्धी स्थिर झाली आहे असे समजावे ||57|| ज्याप्रमाणे कासव सर्व बाजूंनी आपले अव्यय इच्छेप्रमाणे आत ओढून घेतो. त्याच प्रमाणे जेव्हा पुरूष इंद्रियांच्या विषयांपासून आपले इंद्रियांना सर्व प्रकारे आवरून घेतो ,तेव्हा त्याची बुद्धी स्थिर (समाधिस्थ) झाली, असे समजावे ||58|| इंद्रियांपासून विषयभोग घेणारे जीवात्म्याचे केवळ विषयच दूर होतात ,परंतु त्याच्या विषयांबदल जे आवड व राग आहेत ते नहीशी होत नाही, परंतु उपभोगाची आवड सोडून दिल्याने त्याचे सर्व गोडी परमात्म्याचे (उच्चस्तरीय) दिव्य आनंदाचे अनुभव झाल्यावर पूर्णपणे निवृत्त (नष्ट) होतात ||59|| हे अर्जुना ! आसक्ति नाहीशी न झाल्यामुळे ही

क्षोभ उत्पन्न करणारी इन्द्रिया प्रयत्न करीत असलेल्या बुद्धीमान व्यक्तींचे मनाला सुद्धा ते बल-जबरी ने आपल्याकडे हिरावून घेतात ||60|| म्हणून साधकाने त्या सर्व इंद्रियांना तांबेत ठेवून, वर प्रमाणे चित्त स्थिर करून, मनाला माझेच (ज्ञानाचेचं) आधार देऊन (परमात्मा चिंतन) ध्यानात बसावे. कारण ज्याचे इंद्रिया ताब्यात असतात, त्याचीच बुद्धी स्थिर होते ||61|| विषयांचे निरंतर चिंतन करणारे माणसांचे त्या विषयात आसक्ति निर्माण होते. आसक्ती मुळे त्या विषयांबदल कामना उत्पन्न होतात आणि कामना (इच्छा) पूर्ण झाल्या नाही की क्रोध येतो ||62|| क्रोधामुळे मूढता उत्पन्न होते. मूढतेत मुळे स्मरणशक्ती भ्रष्ट होते. स्मरणशक्ती भ्रष्ट झाली की बुद्धीचा (ज्ञान शक्तिचा) नाश होतो आणि बुद्धीचा नाश झाले की त्या माणसाचा अध:पात (पापी) होतो ||63|| परंतु अंत:करणाला माझ्या (भक्तीत) ताब्यात ठेवलेल्या (संयमी) व्यक्ती आपल्या राग-द्वेषादि रहित व स्वाधीन इंद्रियांचे द्वारा विषयांचा उपभोग घेत असूनही तो (स्वतःचे) अंत: करण्याची प्रसन्नता प्राप्त करून घेतो ||64|| अंत:करण प्रसन्न असल्यामुळे त्याची सर्व दु:खे नाहीशी होतात आणि त्या प्रसन्न चित्त असलेल्या कर्मयोग्याची बुद्धी तत्काल सर्व गोष्टीतून निवृत्त होऊन परमात्म्याच्या प्राप्ती मध्ये उत्तम प्रकारे स्थिर होते ||65|| मन आणि इंद्रियांना न जिंकणार अयुक्त पुरूषांच्या ठिकाणी निश्यात्मक बुद्धी (एकाग्र) नसते .असे अस्थिर मन असलेल्या माणसाला शान्ति सुद्धा मिळत नाही. मग शान्ति नसलेल्या माणसाला सुख (आत्मानंद) कोठून मिळणार ? ||66|| कारण ज्याप्रमाणे पाण्यात चालणारे नौकेला वारा आपले दिशेने वाहून घेतो. तसेच विषय सुखात राहणारी इंद्रिया विवेकी (मोक्ष इच्छित) पुरूषांची बुद्धीला -सुद्धा जबरदस्तीने (इंद्रिय सुखरूपी विचारात व त्यांच्या भोगात) हिरावून घेतात ||67|| म्हणून हे महाबाहो

अर्जुना ! ज्याची सर्व इंद्रिया सर्व प्रकारे इंद्रियांच्या (भोग) विषयांपासून आवरून घेतलेली आहेत त्यांचीच बुद्धी (परमात्म्यात) स्थिर होते ||68|| सर्व प्राण्यांच्या दुष्टाने जी (परमात्मा चिंतन) रात्रीसारखी असते ,अशा नित्य, ज्ञानस्वरूप आत्मसंयमी मुनीला जाग्रतीची वेळ असते आणि ज्या नाशवंत सांसारिक (विषय) सुखाच्या प्राप्तीत सर्व प्राणी जागे असतात, ती परमात्मतत्व (उत्तम प्रकारे) जाणणारे व आत्मनिरीक्षण करणाऱ्या मुनीला ती वेळ रात्रीसारखी असते ||69|| ज्याप्रमाणे निरनिराळ्या नद्यांचे पाणी स्थिर असलेल्या समुद्राला विचलित न करता समावून जातात. त्याच प्रमाणे सर्व भोग स्थितप्रज्ञ व्यक्तीत कोणत्याही प्रकारे विकार उत्पन्न न करता समावून जातात. त्यालाच परम शान्ति प्राप्त होते ,(काम) विषय भोगांची इच्छा ठेवणारा व झगड़णारे नव्हे ||70|| जो सर्व काम व आसक्ति सोडून, ममता (स्वामित्व) , अंहकार आणि इच्छा टाकून राहत असतो, तोच (मनाची) पूर्ण शान्ति प्राप्त करतो ||71|| हे अर्जुना ! ब्रह्म स्थिती प्राप्त झालेल्या पुरूषांची सुद्धा हीच (शान्ति) स्थिती आहे. ही स्थिती प्राप्त झाल्यानंतर योगी कधीही मोहित होत नाही आणि अंत (मृत्यूच्या) वेळी ब्रह्म (एकतत्वा) मध्ये स्थिर होऊन तो ब्रह्मनिर्वाण (ब्रह्मरूपी मुक्ति) म्हणजे भगवद् धाम मिळवतो ||72||

*************************************************************

# कर्मयोग

---

## अर्जुन म्हणाला

हे जनार्दना ! जर तुम्हाला सकाम कर्मापेक्षा बुद्धी (भक्ति) श्रेष्ठ वाटत आहे, तर मग हे केशव ! मला या भयंकर कर्म (युद्ध) करण्यास का प्रवृत्त करीत आहात ?॥1॥ आपल्या मिश्रीत भाषणाने माझ्या बुद्धीला जणू मोहित करीत आहात. म्हणून अशी एकच गोष्ट निश्चित करून मला सांगा की ,ज्यामुळे माझे कल्याण होईल ॥2॥

## श्रीभगवान म्हणाले

हे निष्पाप अर्जुना ! या जगात (आत्मसाक्षातकार करण्यास) दोन प्रकारचे निष्ठा मी पूर्वीच सांगितले आहे. त्यातील सांख्यांची निष्ठा ज्ञानयोगाने तर योग्यांची निष्ठा (भक्तीरूपी यज्ञ) कर्म योगाने होते ॥3॥ (शास्त्रोक्त) कर्म अनुष्ठान केल्याशिवाय मनुष्य (संसार) कर्मबंधनातून मुक्त होत नाही आणि (अशुध्दचित्त असलेल्या) फक्त कर्मांचा (संन्यास) त्याग केल्याने कोणीही सिद्धी प्राप्त करू शक्त नाही ॥4॥ नि:संयतपणे कोणीही मनुष्य कोणत्याही वेळी ,क्षणभर सुद्धा कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही. कारण सर्व मनुष्य समुदाय प्रकृती पासून उत्पन्न झालेल्या (राग- द्वेषा दि) गुणांमुळेचं पराधीन (मोहवंश) असल्यामुळे (शरीरासाठी) कर्म करायला भाग पाडला जातो ॥5॥ जो मूर्ख मनुष्य आपल्या सर्व इंद्रिये आवरून (ध्यानस्थ) मनाने इंद्रियांचे विषयांचे चिंतन करीत राहतो, तो मिथ्याचारी म्हणजे दांभिक (ढोंगी) म्हटला जातो ॥6॥ परंतु हे अर्जुना ! जो मनुष्य मनाने स्वत:चे इंद्रियांना ताब्यात ठेवून आसक्त न होता सर्व इंद्रियांचे द्वारा (शास्त्रोक्त) कर्मयोगाचे आचरण करतो, तोच व्यक्ती श्रेष्ठ होय ॥7॥ म्हणून तू शास्त्रविहित (यज्ञ,उपासणादि) नित्य कर्तव्य कर्म कर. कारण कर्म न

करण्यापेक्षा तर तुझे कर्म करणेचं श्रेष्ठ आहे. तसेच कर्म न करण्याने तर तुझे शरीर निर्वाही सिद्ध होणार नाही ||8|| विहित कर्म हेच यज्ञ || यज्ञानिमित्त (श्रीविष्णु प्रीत्यर्थ) केल्या जाणारा निष्काम (इच्छा न ठेवून) कर्म सोडून दुसरे सर्व सकाम कर्म मनुष्याला बंधनकारक (पुन: दुखरूपी जन्म देणारे) आहेत .म्हणून हे अर्जुना ! तू फलांची इच्छा सोडून यज्ञासाठी (नित्य "गीता पाठ" ज्ञानयज्ञ इत्यादि आणि "हरे कृष्ण" जपयज्ञ) उत्तम प्रकारे कर्तव्य कर्म करीत रहा ||9|| सृष्टिचक्र || प्रजापती (विष्णुने) सृष्टिच्या आरंभी यज्ञासह प्रजा उत्पन्न करून त्यांना म्हणाले की, तुम्ही या वेद वर्णित यज्ञांनी उत्कर्ष करून घ्या म्हणजे हे यज्ञ कामधेनु (गाय) प्रमाणे तुमचे सर्व इच्छित मनोरथ पूर्ण करतील आणि तुम्ही समृद्ध व्हाल ||10|| तुम्ही या यज्ञांने देवतांची पृष्ठी (प्रसन्न) करा आणि त्या देवतांनी तुम्हाला पुष्ट (फल प्रदानं) करावे. अशा प्रकारे नि:स्वार्थ सहयोगाने एकमेकांची उन्नती करीत तुम्ही वरदान व परम कल्याणाची प्राप्ती कराल ||11|| यज्ञाने पुष्ट झालेल्या देवता तुम्हाला न मागते इच्छित भोग खात्रीने देत राहतील. अशा रीतीने त्या देवतांनी दिलेले भोग त्यांना अर्पण न करता जो स्वत: खातो, तो चोरच होय ||12|| यज्ञ करून शिल्लक राहलेले अन्न खाणारे लोक सर्व पापापासून मुक्त होतात. पण जे पापी लोक स्वत:च्या शरीर पोषणासाठी अन्न शिजवतात ,ते तर पापच खात असतात ||13|| त्यागी व भोगी || सर्व प्राणी अन्नापासून उत्पन्न होतात, अन्न निर्मिती पावसापासून शक्य होते.पाऊस यज्ञामुळे पडतो आणि यज्ञ विहित कर्मांमुळे (म्हणजे वैदिक क्रियायांमुळे) घडतो ||14|| यज्ञ इत्यादि कर्म समुदाय वेदांपासून आणि वेद अविनाशी परमात्मा पासून उत्पन्न झाले आहेत असे समज .यावरून हेच सिद्ध होते की ,सर्वव्यापी परम ब्रह्म अक्षर परमात्मा (श्रीविष्णु) नेहमी यज्ञात प्रतिष्ठित (स्थित) असतात ||15|| हे पार्थ ! जो

व्यक्ती या जगात अशा प्रकारे परंपरेने चालत असलेल्या सृष्टि चक्राचा अनुसरण करत नाही, व कर्तव्य कर्म करीत नाही. तो इंद्रियतृप्ती मध्येच समाधानी राहणारा , पापमय व अल्प आयुष्य असलेला व्यक्ती ह्या जगामध्ये व्यर्थच जगत असतो ||16|| ज्ञानवंताने कर्म सोडू नये परंतु जो आत्म्यातच (रत) तृप्त आहे आणि आत्म्यातच पूर्णपणे संतुष्ट असतो, त्याला (ह्या जगात) कोणतेही कर्तव्य कर्म नाही ||17|| त्या माणसाला ह्या जगात कर्म करण्याचे काही प्रयोजन असत नाही, तसेच कर्म न करण्याचेही काही प्रयोजन असत नाही आणि त्याला सर्वत्र स्थित प्राणी मात्रांचे जरा देखील आश्रयाची गरज पडत नाही ||18|| म्हणून तू नेहमी आसक्त न होता कर्तव्य कर्म चांगल्या प्रकारे करीत राहा .कारण आसक्ती सोडून कर्म करणारा मनुष्य (मृत्यूनंतर) परमेश्वरला प्राप्त करतो ||19|| राजर्षि जनकादि लोकही आसक्तिरहित कर्म करून परम सिद्धीची (कृष्ण धामाची) प्राप्ती केली आहेत. तसेच लोकसंग्रह (शिक्षणा) हेतू तुला आसक्तिरहित कर्म करणेचं उचित आहे ||20|| श्रेष्ठ व्यक्ती जसे आचरण करतात ,त्याचप्रमाणे इतर लोकही आचरण करतात . तो जे काही प्रमाण म्हणून सांगतो ,त्याच प्रमाणे सर्व मनुष्य समुदाय वागू लागतात ||21|| हे पार्थ ! माझ्यासाठी कुठलेही कर्तव्य कर्म नाही, कारण या तिन्ही लोकात अप्राप्य व प्राप्त करणे योग्य असे एखादी कुठलेही वस्तु मिळवायाची (इच्छा) नाही. तरी सुद्धा, मी माझे सर्वकर्म (प्रामाणिकपणे) करीत आहे||22|| कारण हे पार्थ ! जर का मी सावध राहून वेळेवर कर्म केले नाही ,तर मोठे नुकसान होईल. कारण सर्व मनुष्य सर्व प्रकारे माझेच मार्गांचे अनुसरण करतील ||23|| म्हणून जर मी कर्तव्य कर्म केले नाही तर हे सर्व ग्रहलोक नष्ट होऊन जातील. तसेच मी अनावश्यक प्रजा उत्पन्न करणारा आणि या सर्व प्रजेच्या शांततेचा नाश करणारा होईन ||24|| हे

भारता ! कर्मात आसक्त असलेले अज्ञानी लोक ज्या रीतीने कर्म करतात, त्याच रीतीने आसक्ती नसलेल्या विद्वानाने लोकसंग्रह (शिक्षित) करण्याच्या इच्छेने (निष्काम) कर्म (जपयज्ञ) करावेत ||25|| परमात्मा स्वरुपात स्थिर असलेल्या ज्ञानी व्यक्तीने सकाम कर्मात असलेल्या अज्ञानी लोकांच्या बुद्धीत भ्रम निर्माण करू नये ,उलट स्वत: शास्त्र विहित सर्वकर्मे अनासक्त मनाने उत्तम प्रकारे करीत त्यांच्या कडूनही तशीच (श्रीविष्णु पीथार्थ निष्काम) कर्मे करून घ्यावी ||26|| कर्मात अलिप्त कसे राहावे ? || वास्तविकपणे सर्वकर्मे सर्वप्रकारे प्रकृतीच्या तीन गुणांचे प्रभावाखाली केली जातात. परंतु अन्त:करण अंहकाराने मोहित झालेला आत्मा "मी कर्ता आहे" असे (स्वत:ला शरीर) मानतो ||27|| पण हे महाबाहो ! आत्मगुण आणि कर्म विभाग यांचे तत्व जाणणारे ज्ञानयोगी जाणतो की "आत्मगुण" आणि "कर्म" (तत्व) हे वेगळे आहेत. (ते "मी" कर्तेपणचा अभिमान करत नाही) ते शरीराचे इंद्रिया वेग- वेगळ्या कार्यात प्रवृत्त आहेत असे मानतात आणि कर्मात आसक्त होत नाही (सर्वांना पासून मी भिन्न व स्थिर आत्मा आहे असे जाणतो) ||28|| भौतिक प्रकृतीच्या गुणांनी अत्यंत मोहित झालेले अज्ञानी माणसं प्रकृतीच्या गुणात आणि कर्मात आसक्त होतात. म्हणून ज्ञानी व्यक्तीने असे अज्ञानी आणि मंद बुद्धी लोकांचे मनाला विचलित करण्याचा प्रयत्न करू नये ||29|| म्हणून हे अर्जुना ! माझ्या ठिकाणी सर्व प्रकारच्या कर्मे मला समर्पित करून ,आत्मभावाने आशा व ममतारहित लाभेच्छारहित होऊन याप्रमाणे तू युद्ध कर ||30|| जे कोणी मानव दोषदृष्टि टाकून श्रद्धायुक्त अंत करणाने माझे या मताचे श्रद्धा आणि भक्तीसहित , द्वेषरहित नेहमी अनुसरण करतात, ते सर्व प्रकारचे कर्म करीत असले जरी ते सर्व (नौकरी, व्यवसाय इत्यादि) सकाम कर्मबंधनातून मुक्त होतात ||31|| परंतु ,जे मानव

माझ्यावर दोषारोपण करून माझ्या या आदेशानुसार वागत नाही, त्या मूर्खांचे तू सर्व प्रकारचे ज्ञानामध्ये पूर्णपणे मूर्ख असलेले आणि नष्ट (पथ भ्रष्ट) झालेले समज ||32|| विवेकी लोक सुद्धा आपल्या स्वभावानुसारच व्यवहार करतात. सर्व जीव व प्राणीमात्र आपल्या स्वभाव अनुसारच कर्म करतात, मग या विषयांत सर्व जीव बलेच स्वत:चे इंद्रियसंयम कसे काय करू शकतील ? ||33|| काम-क्रोधापासून सावध राहा || प्रत्येक इंद्रियांच आप-आपल्या विषया बदल राग आणि द्वेष असतो ,ते स्वाभाविक आहेत. माणसाने त्या दोन्हीच्या आहारी जाता कामा नये. कारण ते दोन्ही तुझ्या कल्याण व परमेश्वर प्राप्तीच्या मार्गात विघ्न टाकणारे मोठे शत्रू आहेत ||34|| चांगल्या प्रकारे आचरणात आणलेल्या दुसरे धर्माहून दोषरहित स्वधर्मच श्रेष्ठ आहे. तरी आपल्या (क्षत्रिय) धर्मात तर मरणेही कल्याण कारक आहे.पण दुसऱ्याच्ये (वैश्य व व्यवसायी,शूद्रांचे व नौकरशाही) धर्म तर (मोठे) भय देणारे आहेत ||35|| मग मनुष्य पापरूपी आचरण का करतो ||

## अर्जुन म्हणाला

हे कृष्णा ! तर हा मनुष्य स्वत:ची इच्छा नसताना जबरदस्तीने करव्यास लावणारा कोणाच्या प्रेरणेने पापांचे (अधर्म, हिंसा,निंदा आदिचे) आचरण करतो ? ||36|| काम व क्रोध हे एकच याला कारण ||

## श्रीकृष्ण म्हणाले

हे अर्जुना ! रजोगुणापासून उत्पन्न झालेला हेच “काम” (विषय भागण्याची इच्छा) क्रोधामध्ये रूपांतरित होते .अतिशय उग्र, सर्व भक्षण करणारा ,भोगांनी कधीही तृत्प (संतुष्ट) न होणारा व मोठा पापी आहे .तोच या विषयातील वैरी (राजा) आणि या जगात सर्व प्राणीमात्राचा प्रधान शत्रूही तोच आहे ,हे तू जाण ||37|| जसे धूराने अग्नी, धुळीने आरसा आणि वायुने गर्भ झाकलेला असतो ,त्याच प्रमाणे हा जीव

कामाने (भोग-इच्छाद्वारा ) सदैव आच्छादलेला (झाकलेला) असतो ||38|| आणि हे अर्जुना ! त्यानेच (आत्मा-परमात्माचे) ज्ञान झाकलेला ,ज्ञानी (विवेकी) माणसांचा नित्य शत्रू आहे, तो काम कधीही तृप्त न होणारा सतत हा (काम) अग्नी प्रमाणे जळत असतो ||39|| कामक्रोध कसे जिंकावे ? || पाच इंद्रिये , मन आणि बुद्धी हे यांचे निवास स्थान म्हटले जातात. हा कामच मन, बुद्धी आणि इंद्रियांच्या द्वारा (परमात्मा च्या) ज्ञानाला झाकून देहधारी जीवात्माला मोहित करतो (परमेश्वराची विस्मृति करून नश्वर भोग प्राप्तिच्या मार्गावर नेतो) ||40|| म्हणून हे अर्जुना ! तू सर्व प्रथम इंद्रियांवर ताबा ठेवून ज्ञान विज्ञान (आत्म साक्षात्काराचे ज्ञान) यांचा नाश करणारे मोठ्या पापी कामाला अवश्य बळेच मारून टाक ||41|| इंद्रिया स्थूल शरीरापेक्षा श्रेष्ठ, बलवान आणि सूक्ष्म आहे. या इंद्रियाहून मन श्रेष्ठ आहे, मनाहून श्रेष्ठ बुद्धी आहे आणि बुद्धीहून अत्यंत पर व श्रेष्ठ ,तो आत्मा आहे ||42|| मनाला सतत परमात्मा ज्ञानात ठेवावे || अशा प्रकारे जीवात्मा (आत्मा) बुद्धीहून श्रेष्ठ आहे हे असे जाणून आणि बुद्धी (भक्ती) द्वारा मनाला आत्म्यात स्वाधीन करून हे महाबाहु ! तू या कामरूपी दुष्कर शत्रूला (श्रीकृष्ण भक्तीने ,श्रवणाने) कायमचाच मारून टाक ||43||

************************************************************

# ज्ञानयोग

-----------------------------------------------------------------------------------------------------------------------------
-----

## संजय धृतराष्ट्राला म्हणाला

"हे राजा धुतराष्ट्र ! श्रीकृष्ण अर्जुनाला जे काही गुज सांगत आहे ते अर्जुनचे केवढे भाग्य वसुदेवाला सांगितले नाही सनकादिकांना ,देवकीला सांगितले नाही, श्रीलक्ष्मीला सुद्धा हा योग सांगितले नाही ! अर्जुनावर त्याचे अलोट प्रेम आहे" ।।(श्रीज्ञानेश्वरी)।।

## श्रीभगवान म्हणाले

मी हा अविनाशी योग (सर्व प्रथम) सूर्य देवाला सांगीतला होता , सुर्यदेवाने (मानव जातीचा जनक स्वयंभू) मनुला सांगितले आणि मनूने आपल्या पुत्र राजा इक्ष्वाकूला सांगीतला ॥1॥ हे परंतप अर्जूना ! अशा प्रकारे परंपरेने प्राप्त हा योग राजर्षिनी (इक्ष्वाकू वंशानी) जाणले. परंतु त्यानंतर पुष्कळ काळापासून हा योग या पृथ्वीवर (देहबुद्धी व लोभ वाढल्याने) नष्ट प्राय (दूषित) होऊन गेला ॥2॥ तू माझा भक्त आणि प्रिय सखा आहेस. म्हणून तोच पुरातन योग आज मी तुला सांगीतला आहे .कारण हा (योग) अतिशय उत्तम आणि रहस्य मय आहे ॥3॥ अर्जुनाचा प्रश्न ॥

## अर्जुन म्हणाला

आपला जन्म तर अलीकडचा आणि सूर्याचा जन्म फार पूर्वीचा .तर मग आपणच आरंभी सूर्याला हा योग सांगीतला होता, हे कसे समजू ? ॥4॥

## श्रीभगवान म्हणाले

हे अर्जुना ! माझे आणि तुझे पुष्कळ जन्म होऊन गेलेत (व्यतीत झालेत). ते मी सर्व जाणतो पण ते तू जाणू शकत नाही ॥5॥ मी जन्मरहित (जन्मम

नसलेला),अविनाशी असणारा व सर्व प्राण्यांचा ईश्वर (मालक) असूनही माझ्या (योगमायीक) अंतरंग शक्तिने मी माझ्या मूळ (सच्चिदांनद) स्वरूपात प्रकट होत असतो ||6|| हे भारता ! जेव्हा जेव्हा धर्माचा नाश आणि अधर्माची वाढ होत असते, तेव्हा तेव्हा मी निश्चित स्वत:चे दिव्य ,नित्य देह रूप रचतो म्हणजे आकार घेऊन लोकांसमोर (मानव रूपात) प्रकट होतो ||7|| माझ्या एकांत भक्तांच्या उद्धारासाठी ,दुष्टांचा विनाश आणि धर्माची उत्तम प्रकारे पुन: स्थापना करण्यासाठी मी युग युगात प्रकट होतो ||8||

## भगवंताचे स्वरूप व त्याचे भक्त

हे अर्जुना ! माझे जन्म (अवतार), कर्म दिव्य व अप्रकृत (त्रिगुणात्मक प्रकृती पासून वेगळे) आहेत .असे जो मनुष्य तत्वत: जाणतो, तो (व्यक्ती) शरीराच्या त्याग केल्यानंतर पुन्हा जन्मास येत नाही, तर तो (कायमचा) मलाच प्राप्त होतो ||9|| पूर्वी ज्यांचे आसक्ती, भय आणि क्रोध पूर्णपणे नाहीसे झाले होते आणि जे माझे आश्रित राहलेले ते सर्व भक्त (परमात्मा) अनेकानेक ज्ञानरूपी तपाने पवित्र होऊन माझ्या दिव्य प्रेमरुपी भक्तीला प्राप्त झाले आहेत ||10|| हे अर्जुना ! जे भक्त मला ज्याप्रकारे भजतात मीही त्यांना त्याच प्रमाणेचं भजतो (फल) देतो. कारण ते (सर्व भक्तगण) सर्व प्रकारे माझेच मार्गांचे (श्रीगीताचे) अनुसरण करतात ||11|| या भौतिक जगतात कर्म फलाची इच्छा करणारे लोक देवतांची (वेदरूपी) यज्ञाद्वारा पूजा अर्चना करतात .कारण या मनुष्य-लोकात सकाम कर्मापासून सिद्धी व फल लौकरच मिळतात ||12|| [ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य (शेतकरी,व्यवसायी) आणि शूद्र (नौकरशाही)] चार (मनुष्य) वर्णसमूह आणि त्यांच्या कर्म विभागाने मी सृष्टि रचना केली आहे .त्या कर्मांचे मी कर्ता असूनही मला अविनाशी परमात्म्याला तू वास्तविक अकर्ताच समज

||13|| कर्म फलांची मला इच्छा नाही. त्यामुळेचं कर्मांचे मला बंधन होत नाही. अशा प्रकारे जो मला तत्वत: जाणतो त्याला सुद्धा कर्मबंधन करीत नाही ||14|| पूर्वीच्या (राजर्षि जनकादि) मुमुक्षांनी सुद्धा असे जाणूनच सर्व कर्मे केली आहेत. म्हणून तू पण पूर्वजांकडून नेहमीच केली जाणारी कर्मच कर ||15|| कर्म काय ? व (अशुभ) अकर्म काय यांच्या विषयी बुद्धीमान लोक सुद्धा संभ्रमात पडतात. म्हणून ते कर्मांचे तत्व मी तुला नीट समजावून सांगतो. ते कळले की तू अशुभ (दुखरूपी) संसारातून (कायमचा) मुक्त होशील ||16|| कर्माचे स्वरूप आणि अकर्माचे स्वरूपही जाणले पाहिजे. तसेच (भक्तिकर्म) विकर्माचे स्वरूपही जाणले पाहिजे. कारण तात्विक स्वरूप समजण्यास कठीण आहे ||17|| ज्ञानी मनुष्यांचे कर्म || जो कर्मात अकर्म आणि अकर्मात कर्म पाहील, तोच मनुष्यांमध्ये बुद्धीमान होय आणि तो सर्व कर्म करीत असला तरी दिव्य स्तरावर स्थित आहे ||18|| ज्याचे सर्व शास्त्रविहित कर्मे कामनाशून्य व संकल्परहित होत असतात, तसेच ज्याचे सर्व (शुभ-अशुभ) कर्म ज्ञानरूपी अग्नीने पूर्णपणे जाळून गेली आहेत, असे व्यक्तीला ज्ञानी लोकही "पंडित" म्हणतात ||19|| जो सर्वकर्म आणि कर्मफलात आसक्ति पूर्णपणे टाकून ,तसेच सांसारिक आश्रय (ममता) सोडून परमात्म्यात (भक्तिमध्ये) नित्य तृप्त राहतो, तोच (सर्व प्रकारचे) कर्मात उत्तम प्रकारे वावरत असूनही वास्तविकपणे काहीच करत नसतो ||20|| जो कामनाशून्य आहे, ज्याचा अंत:करण, चित्त व इंद्रिया संयमित (वश मध्ये) आहेत आणि ज्यांनी सर्व भोग सामग्रीवर स्वामित्वाचा त्याग केला आहे. असे (मन) वशीभूत माणसं केवळ शरीर संबंधी कर्म करीत असला तरी तो कधीही पापग्रस्त होत नाही ||21|| जो सहज मिळालेल्या पदार्थात नेहमी संतुष्ट असतो ,मत्सर मुळीच करत नाही. जो सुखÐदुःख इत्यादि द्वंद्वांमध्ये

सहनशील, सिद्धीत व सिद्धीत समभाव ठेवणारा कर्मयोगी सर्व (भौतिक आणि आध्यात्मिक) कर्म करत असूनही त्याला कुठलेहि कर्म बंधनकारक होत नाही ||22|| जे (कर्म फलात) आसक्तरहित आहेत, (सांसारिक द्वंद्वापासून) मुक्त झाले आहेत आणि ज्याचे चित्त नेहमी (परमात्माच्या) ज्ञानात स्थित आहे ,असा केवल यज्ञासाठी कर्म करणारे माणसाची सर्व कर्मे पूर्णपणे नष्ट होऊन जातात ||23|| ज्या यज्ञात अर्पण अर्थात स्रुवा आदि ब्रह्म आहे, हवन मध्ये लागणारी द्रव्य सुद्धा ब्रह्म आहे. ब्रह्मरूप कर्ता द्वारा ब्रह्मरूप अग्नीमध्ये आहूतही देण्याची क्रिया सुद्धा ब्रह्म आहे ,तसेच ब्रह्म कर्मात पूर्णपणे तल्लीन झालेला व्यक्तीला फक्त ब्रह्मच (परमेश्वराला) प्राप्त करणे योग्य आहे ||24|| यज्ञांचे प्रकार || काही योगी देवांची पूजारूपी यज्ञाचे उपासना उत्तम प्रकारे अनुष्ठान करतात ,तर इतर काही ब्रह्मरूपी अग्नीत (वेदांतील) यज्ञांच्या द्वारा यज्ञातच (क्रियांची) आहूतही देतात ||25|| दुसरे काही योगी "कान,नाक" इत्यादि इंद्रिये संयमरूपी अग्नित हवन करतात ,तर इतर अन्य (गृहस्तगण) इंद्रियरूपी अग्नीत शब्दादि-विषयांचे हवन करतात ||26|| अन्य योगीजन सर्व इंद्रियाच्या क्रियांना व प्राणांचे (दोन्ही नाकाचे व प्राण-अपान वायुचे) क्रियांना ज्ञानाने प्रकाशित आत्मसंयम योगरूपी अग्नीत हवन करतात ||27|| हे अर्जुना ! काही लोक द्रव्य विषयरूपी (धन,अन्न दाना दि) यज्ञ करतात, काही लोक तपश्चर्यारूपी यज्ञ आणि काही योग-अभ्यासरूपी यज्ञ करतात. इतर काही लोक वेदांचे स्वाध्याय (अध्ययन) व त्यांचे ज्ञान (अर्थ) रुपी यज्ञ करतात, ते सर्व प्रयत्न शील कडक (त्रास दायक) व्रते करणारे आहेत ||28|| तसेच काही योगी (नाडी शुद्धि,) प्राणात अपान वायुचे व अपमानामध्ये प्राणवायुची आहूतही देतात ,कोणी कोणी तर (योग-अभ्यासाने) दोन्ही वायुचे गती थांबवून प्राणायाम परायण होतात आणि

कितीतरी अल्प आहार (उपवास) करून प्राणांचे प्राणातच हवन करीत असतात ||29|| ते सर्व साधक यज्ञांना जाणणारे आहेत. ते यज्ञांचे द्वारा पापाच नाश करून यज्ञांच्या अवशिष्ट अमृत फलांचा (भोग-ऐश्वर्य-सिद्धी) भोग घेतात ज्यामुळे ते (आनंदानी) ब्रह्म अविनाशी तत्वाची प्राप्ती करतात ||30|| हे कुरूश्रेष्ठ अर्जुना ! जो (शास्त्रात सांगितलेले) यज्ञ करीत नाही त्याला (अल्प सुख विशिष्ट) मनुष्यलोक सुद्धा (सुखदायक) नाही ,मग अन्य (पर) लोक व पुढील जीवन कसे सुखदायक असतील ||31|| असे प्रकारे, अनेक प्रकारचे यज्ञ प्रजापतीचे (श्रीविष्णुच्या) मुखातून विस्तृत रुपात वर्णन झाले आहेत. त्यांना तू सर्व "कर्म जनित" (वाणी-मन-शरीरादि क्रिया इंद्रियांपासून उत्पन्न) जाण, असे प्रकारे तू मोक्ष प्राप्त करशील ||32|| हे परंतप अर्जुना ! ज्ञानयज्ञ द्रव्यमय यज्ञा पासून श्रेष्ठ आहे .कारण सर्व कर्म ज्ञानरूपी (अग्नित) अर्थामध्ये समाप्त (हवन) होतात ||33|| ते सर्व यज्ञ तू तत्त्वज्ञानी लोकांकडे जाऊन समजून घे, त्यांना सांष्टांग नमस्कार कर, सेवा कर आणि निष्कपटपणे सरळ त्यांना प्रश्न विचारल्याने, (आत्मा-परमात्मा) तत्व उत्तम प्रकारे जाणणारे ते ज्ञानी (आत्मसाक्षात्कारी) तुला त्या तत्वज्ञानाचा उपदेश देतील ||34|| ते जाणल्याने पुन्हा तू अशा प्रकारच्या मोहात कधीच पडणार नाही. तसेच हे अर्जुना ! त्या ज्ञानामुळे तू सर्व प्राणिमात्राला आत्म्यात (आत्मस्वरूपात) नंतर माझ्यात म्हणजे माझ्येच अंश आहेत हे तू पाहशील ||35|| ज्ञानामुळे काय घडेल?|| जरी तू इतर सर्व पापण्यांहूनही अधिक पाप करणारा (दुराचारी) असल्यास , तरी (परमात्मा) ज्ञानरूपी नौकेने तू खात्रीने या संपूर्ण (दु:ख व) पापरूपी संसार समुद्राला चांगल्या प्रकारे तरून जाशील ||36|| कारण हे अर्जुना ! ज्याप्रमाणे पेटलेला अग्नी इंधनाचा राख करतो, त्याच प्रमाणे ज्ञानरूपी अग्नी सर्व (शुभ-अशुभ) कर्मबंधने भस्मसात (नष्ट)

**करतो ||37|| कारण ज्ञानासारखे पवित्र (पापांचे नाश) करणारे खात्रीने या जगात दुसरे अस्तित्वात काहीच नाही. ते (परमेश्वरीय रूपी) ज्ञान भक्तियोगात सिद्ध झालेले व्यक्ती सहजच योग्य वेळी स्वत:च्या आत्म्यात (हृदयात) आस्वादन (प्राप्त) करतो ||38|| श्रद्धालु , जितेंद्रिय (इंद्रिय संयम), साधना मध्ये तत्पर राहणारा व्यक्ती ज्ञान मिळवितो आणि ज्ञान प्राप्त झाल्यावर तो तत्काल भगवत्प्राप्ती स्वरूप परम (दिव्य) शांती (परमात्मा नंद) लौकरच मिळवतो ||39|| हे आत्मज्ञान कोणाला मिळते ? || अविवेकी आणि श्रद्धा नसलेला ,संशयी (मनात प्रश्न ठेवणारा) मनुष्य परमार्थ पासून निश्चित खात्रीने भ्रष्ट होतो .(मनात परमेश्वरा बदल) संशय ठेवणारे माणस ना ह्या (मनुष्य) लोकात नाही परलोकात (व पुढील जीवनात) सुख प्राप्त करू शकतो ||40|| हे धनंजया ! ज्याने (भक्ती व यज्ञयुक्त) कर्म योगाच्या आधारे सर्व कर्म फलांचा त्याग केला आहे आणि ज्ञानाने सर्व संशयाचा नाश केला आहे ,असे आत्मज्ञानात स्थित माणसाला (भौतिक आणि आध्यात्मिक) कर्म कधीच बंधन कारक होत नाही ||41|| हे भारत ! तू आपल्या हृदयात स्थित अज्ञान द्वारा उत्पन्न या संशयाला ज्ञान (आत्मज्ञान) रुपी तलवारीने नाश करून (जय-पराजय सोडून) समतत्व योगाचे आश्रय घेऊन तू युद्धाला उभा हो ||42||**

***Note:** भगवद्गीता, पुराणांचे ,रामायण पवित्र ग्रंथांचे नित्य पाठाला ज्ञानयज्ञ आणि “हरे कृष्ण” कृष्ण मंत्रांचे निरंतर जपाला जपयज्ञ असे म्हणतात ।।*

*************************************************************

# कर्मसंन्यास योग

---

## अर्जुन म्हणाला

हे कृष्णा ! तुम्ही संन्यासा बदल सांगता आणि आता परत त्या (यज्ञ) भक्तिपूर्ण कर्मयोगाची प्रशंसा ही करत आहात ! तेव्हा या दोन्ही पैकी माझ्यासाठी अगदी निश्चित कल्याणकारक जे एक साधन असेल ते कृपा करून मला सांगा ||1||

## श्रीकृष्ण म्हणाले

कर्मसंन्याय आणि कर्मयोग हे दोन्ही परम कल्याण करणारेच आहेत, पण त्या दोन्हीमध्ये संन्यासाहून (भक्ती, जपयज्ञरूपी) कर्मयोग साधण्यास सोपा असल्याने श्रेष्ठ आहे ||2|| हे अर्जुना ! जो द्वेषरहित आणि अपेक्षा (इच्छा) रहित आहे ,तो कर्मयोगी नेहमी संन्यासी आहे हे तू जाणून घे . कारण तो राग-द्वेष इत्यादि सर्व द्वंद्वांनीरहित असलेला योगी सुखाने या संसार (दुख) रुपी बंधनातून पुर्णपणे (कायमचा) मुक्त होतो ||3|| अज्ञानी लोकच सांख्य (सत-असत वस्तुंचे संख्या करणारे शास्त्र) आणि (भक्तिरूपी यज्ञ) कर्मयोग वेग-वेगळे आहेत असे सांगतात ,पंडित नव्हे. फक्त एकाचे उत्तम प्रकारे आश्रय घेतलेल्या व्यक्तीला दोघांचे एकसारखे फल (परमात्म्याला) प्राप्त करतो ||4|| साख्ययोगाने जो परम धाम प्राप्त होतो, तोच (भक्ती व यज्ञ ) कर्मयोगाने सुद्धा (सहज) प्राप्त होतो. जो मनुष्य दोन्ही योग ऐकच फल देणारे आहेत ,असे पाहतो तोच खरे अर्थाने (तत्वदृष्टीने) पाहतो ||5|| परन्तु हे अर्जुना ! निष्काम कर्मयोग सोडून संन्यास घेणे दुःख कारक आहे, कारण भक्तीमध्ये योगयुक्त मुनी तत्काळ (एक तत्वरूपी) ब्रह्माची प्राप्ती करतो ||6||

## कर्मे घडताना अकर्तेपण

जो भक्तीयोगयुक्त आहे व विशुद्ध आत्मा , आत्मसंयमी, मन व सर्व इंद्रियांवर विजय प्राप्त केलेला आहे आणि जो सर्व प्राणीमात्रांचे प्रति आत्मभूती आहे ,असा कर्मयोगी सर्व प्रकारचे कर्म करीत असला तरी तो कधीच (शुभ-अशुभ) कर्मफलांनी बांधला जात नाही ||7|| आत्मभावना युक्त योगी तत्ववृति ने पाहत असला, ऐकत असला, स्पर्श ,वास , भोजन, निद्रा, श्वास इत्यादि घेत असला ||8|| व कथन, त्याग ,ग्रहण तसेच डोळ्यांची उघडझांप (सर्व शरीराचे व्यवहार) करीत असला तरी तो बुद्धीने निश्चय करून मानतो की सर्व इंद्रिये आप-आपल्या विषयात वावरत आहे ,पण मी (आत्मा) काहीच करत नाही ||9|| जो परमेश्वराला समर्पित आहे आणि जो सर्व सांसारिक कर्मामध्ये आसक्तीचा त्याग करून आपले नियत (धर्मयुक्त) कर्म करतो, तोच पाण्यातील कमलपत्र प्रमाणे पापाने लिप्त होत नाही ||10|| भक्तियुक्त योगी आसक्तिचा त्याग करून केवल इंद्रिये काय, मन, बुद्धी आणि शरीराद्वारा फक्त अंत: करणाच्या शुद्धीसाठी (पापमुक्त होण्यास) कर्म करतात ||11|| भक्तियुक्त योगी कर्मफलात आसक्तीचा त्याग करून निष्ठा व शांतिला (मोक्षाला) प्राप्त करतात आणि कामनांच्या प्रेरणेमुळे कर्म करणारा व्यक्ती कर्मफलात आसक्त होऊन संसारूपी बंधनालाच प्राप्त (भोग मिळवण्यात आसक्त) होतात ||12|| जितेंद्रिय (इंद्रियांवर विजय मिळवणारा) जीव मनाचे द्वारा सर्व कर्मांचा त्याग करून स्वत: काही न करता व करविता तो देहधारी जीव या नव द्वार (नाक, कान इत्यादि) असलेल्या नगरात (भौतिक शरीरात) सखपुर्वक (आनंदानी) राहतो ||13|| परमेश्वर, नाही मनुष्यांचे कर्तेपण (स्वामित्व) ,नाही त्यांचे कर्मांची निर्मिती करतो , नाही त्याचे कर्मफलात संयोग उत्पन्न करतो. तर त्याचा स्वभाव (लोभ, मोह, क्रोध इत्यादि) त्या जीवाला कर्मांमध्ये प्रवृत्त करतो (करायला लावतो) ||14|| सर्वव्यापी

परमेश्वर कोणाचेही पापकर्म किंवा पुण्यकर्म स्वत: कडे घेत नाही .परंतु अज्ञानाने (भोग इच्छांने) ज्ञान झाकलेले आहे .त्यामुळे सर्व लोक मोहित होत आहे (स्वत:ला शरीर समजून शरीराची इच्छा पूर्ण करण्यासाठी जगभर धावपळ करीत आहेत) ||15|| परंतु जेव्हा त्या जीवाचे अज्ञान (परमात्माच्या) ज्ञानाने पूर्णपणे नाहीसे होते ,तेव्हा त्यांचे ते ज्ञान सूर्याप्रमाणे त्या सच्चिदानंद परम भाव (श्रीकृष्णरूपी ज्ञान) तत्वाला प्रकाशित (प्रकट) करतो ||16|| ज्याचे मन, बुद्धी फक्त परमात्म्यात स्थित व परमात्म्याच्या प्रति निष्ठावान आहे, जो नित्य श्रवण किर्तन करणारा (आश्रित) आहे आणि ज्याचे सर्व दोष (मोह) ज्ञानानी धुऊन गेली आहेत, ते सर्व योगी पापरहित होऊन पुन: जन्मास येत नाहीत ||17|| जो ज्ञानी (परमात्मा रूपी) विद्या व विनय यांनी युक्त असलेला ब्राह्मण व्यक्ती गाय , हत्ती, कुत्रा आणि चांडाळ या सर्वांना समदृष्टिने पाहत असतो ||18|| त्याचेच मन समभाव तत्वात स्थिर झालेला आहे आणि त्यांनीच (दुखरूपी) जन्मÐमृत्यूवर पूर्णपणे विजय प्राप्त केला आहे कारण सच्चिदानंद परमात्मा निर्दोष आणि समभावानी युक्त आहे, म्हणून तो सदैव ब्रह्ममध्ये (एकतत्वात) स्थित असतो ||19|| जो प्रिय वस्तु मिळाली असता आनंदी होत नाही आणि अप्रिय वस्तु प्राप्त झाली असता उद्विग्न होत नाही ,तोच स्थिरबुद्धी असलेला संशयरहित ब्रह्मवेता (परमेश्वराला जाणणारा) पूर्णपणे परब्रह्ममध्ये (परमात्म्यात) नित्य स्थित असतो ||20|| व ज्यांचे अत:करणाला बाहेरची विषयाची आसक्ति नसते ,असा साधक आत्मा मध्ये जो (सात्विक) सुख आहे, त्याला तो प्राप्त करतो. असे ब्रह्म योग (परामात्मा ज्ञानाने) युक्त योगी नंतर अक्षय (अविनाशी) सुखाचा उपभोग घेतो ||21|| जे इंद्रिया आणि विषयांच्या संयोगाने उत्पन्न होणारे जे भोग आहेत , ते सर्व भोग सुखरूप असले तरी ते सर्व दु:खांचे कारण,

आदि-अंत होणारे, नश्वर व अनित्य आहेत. असे जाणून बुद्धीमान ज्ञानी लोकं त्यात रमत नाही (व भोगांचे विचार सुद्धा करीत नाही) ||22|| जो साधक व मनुष्य शरीर नष्ट होनाच्या अगोदर काम आणि क्रोधामुळे उत्पन्न होणारे आवेगाला सहन करण्यास समर्थ होतो ,तोच युक्तयोगी व तोच सुखी होय ||23|| जो आत्म्यातच सुखी आहे, आत्मा मध्येच (संतुष्ट) राहणारा आहे आणि आत्मा मध्येच दृष्टी टाकणारा आहे, तोच योगी आत्मसाक्षातकारी आपले मनाला ब्रह्म मध्ये (एकतत्वात) स्थिर करून ब्रह्म निर्वाण म्हणजे ब्रह्ममध्येच मुक्ती (त्रिगुण विकारातून मुक्त भगवदधाम) मिळवतो ||24|| निष्पाप, नि:संशय (संशय नसलेल्या), संयत चित्त असलेल्या आणि सर्व प्राणी मात्रांचे हित करण्यात तत्पर ऋषिगण ब्रह्मनिर्वाणं (ब्रह्मरूपी मुक्ती) निश्चित प्राप्त करतात ||25|| जे संत (इच्छा) काम-क्रोधानी मुक्त आहेत आणि ज्या लोकाने स्वत:चे मन (नियंत्रित) जिंकले आहेत ,त्यांची निकट भविष्यमध्ये ब्रह्मनिर्वान (मुक्ती) निश्चित असते, तेच आत्मसाक्षातकारी आहेत ||26|| बाहेरच्या शब्द-स्पर्श इत्यादि विषयांचा मनात बहिष्कार (विरोध) करून, दृष्टी भुंवयांच्या मध्यभागी स्थिर करून तसेच नाकातून प्राण व अपान वायुला सम करून ||27|| इंद्रिये, मन व बुद्धी ज्यांनी जिंकली (व ताब्यात) आहेत ,असा मोक्ष (इच्छित) परायण मुनी इच्छा ,भय आणि क्रोध यांनी रहित (निर्गुण) झाला की ,तो सर्वत्र मुक्तच असतो ||28|| माझे सर्व भक्त मला सर्व यज्ञाचे आणि तपाचा भोक्ता, सर्व ग्रहलोकांचा व देवांचा महेश्वर (महान ईश्वर,परमेश्वर) ,सर्व प्राणीमांत्राचा सुहृद (अर्थात स्वार्थ रहित प्रेम देणारा) ,असे तत्वत: जाणून ते परम शान्ति (मोक्ष) प्राप्त करतात ||29||

*****************************************************************************

“ भोगी सतत इंद्रियभोग विषयांचे विचारात व मिळवण्याचा प्रयत्न करीत असतात म्हणून ते पुन: जन्म घेतात ”

# अध्याय ६

# (ॐ) ध्यान योग

---

## श्रीभगवान म्हणाले

जो कर्म फलांचा आश्रय न घेता कर्तव्य कर्म करतो, तोच संन्यासी आणि तोच योगी होय. केवल अग्निहोत्रीच (यज्ञ, हवनाचा, उपासनादिचा) त्याग करणारा व कर्तव्यहीन असणारा व्यक्ती "संन्यासी" नव्हे आणि तो "योगी" ही नव्हे ||1|| हे अर्जुना ! ज्याला संन्यास असे म्हणतात, त्यालाच तू योग समज, कारण काम संकल्पांचा (विषय भोगांची इच्छा) त्याग न करण्यात असमर्थ कोणीही पुरूष योगी होत नाही ||2|| योगारूढ मननशील असलेल्या मुनीला योगाची प्राप्ती मध्ये निष्काम कर्म करणे हेच साधन आहे आणि योगारूढ झाल्यावर त्या (संयमी) मुनीचे विक्षेप म्हणजे सर्व कर्मांचा (मन चंचल करणारे कर्मांचे) त्याग (शमन) करणे यालाच साधन (योग) असे म्हणतात ||3|| कारण ज्या वेळी इंद्रियांच्या विषय भोगांत किंवा कर्मांच्या ठायी व्यक्ती प्रवृत्त (आसक्त) होत नाही आणि सर्व संकल्पांचा म्हणजे (कर्म) फलांची इच्छा त्याग करणारे त्या व्यक्तीला योगारूढ (मन एकत्वात स्थिर झाले) असे म्हटले जाते ||4|| माणसानी अनासक्त मनाच्या द्वारा स्वत:चे आत्म्याचा या संसारातून उद्धार करून घ्यावे, आत्म्याची (स्वत:ची) अधोगतही होऊ देऊ नये. कारण आत्मा म्हणजे मनच स्वत:चा बांधव आणि शत्रूही तोच आहे ||5|| ज्याने आपले मन पूर्णपणे जिंकले (वंश केले) आहेत, त्याचा मन मित्र आहे आणि ज्यांनी स्वतःचे मन जिंकले नाही त्याचे शत्रुरूपी मन स्वतःशीच शत्रू प्रमाणे वागत असतो (म्हणजे स्वतःच आपले वाईट करून घेतो) ||6|| शीत-उष्ण, सुख-दुख, इत्यादि तसेच मान अपमानात ज्यांचे अंत:करण पूर्णपणे शांत व स्वाधीन असलेल्या योगी सच्चिदांनद परमात्म्यात समाधिस्थ

असतो (म्हणजे त्यांचे ज्ञानरूपी बुद्धीत परमात्म्याला सोडून दुसरे काहीच नसते) ||7|| ज्यांचे अंत:करण ज्ञान व (परमात्मा) विज्ञानाने तृप्त झाले आहेत आणि ज्याने स्वत:चे (सर्व) इंद्रिये पूर्णपणे जिंकले (नियंत्रित केले) आहेत. तोच एक (ब्रह्म) तत्वात म्हणजे ज्याला माती ,दगड आणि सोने समान आहेत ,त्यालाच युक्त योगी (म्हणजे तो ब्रह्मला प्राप्त झालेला आहे), असे म्हणतात ||8|| जो सुहृद मित्र, शत्रू, उदासीन, मध्यस्थ, द्वेष ,बांधव ,सज्जन आणि पापी या सर्वां विषयी समान भाव ठेवतो तो सर्व साधूंमध्ये विशेष आहे ||9||

## योगाभ्यास (स्थान व आसन)

(कर्म) योगीने एकट्यानेच एकांतात बसून मन व इंद्रियासह शरीर ताब्यात करून आणि काहीही (स्वामित्व) संग्रह न करता आत्म्याला (मनाला) नेहमी माझ्यात (परमात्मा ॐ ध्यानात) लावले पाहिजे ||10|| योग-अभ्यासासाठी शुद्ध (तीर्थ स्थानी, पवित्र) जमिनीवर क्रमाने दर्भ ,मृग चर्म आणि मृदू वस्त्र अंथरून तैय्यार केलेले, जे फार उंच आणि सखलही नाही, असे आपले आसन स्थिर मांडून ||11|| त्या आसनावर बसून चित्त व इंद्रियांच्या क्रिया ताब्यात ठेवून तसेच मन एकाग्र करून अंत:करणाच्या शुद्धीसाठी योगभ्यास करावा ||12|| शरीर ,ठोके आणि मान सरळ रेषेत अचल ठेवून स्थिर व्हावे. नंतर आपल्या नाकाच्या शेडावर दुष्टी ठेवून अन्य दिशांकडे न पाहता ||13|| योगीला ब्रह्मचर्य व्रत पाळून, निर्भय तसेच आपले शांत अंत:करण चित्ताला माझ्या (ॐ) ठिकाणी लावून, मला परम लक्ष्य करून ध्यानात बसावे ||14||

## (ॐ) ध्यानाचा अभ्यास

मन ताब्यात ठेवलेले योगी अशा प्रकारे आत्म्याला नेहमी मज परमेश्वर स्वरुपाच्या ठिकाणी लावून माझ्यात असणारी परमानंदाची पराकाष्ठारूपी शान्ति मिळवतो आणि नंतर माझ्या (श्रीकृष्ण स्थान) धामाची प्राप्ती करतो

||15|| हे अर्जुना ! ज्यास्त आहार करणारा, अजिबात आहार न करणारा, फार झोपाळू तसेच नेहमी जाग्रण करणारे व्यक्तीला हा (ध्यान) योग साध्य होत नाही ||16|| यथायोग्य आहार विहार करणारा, कर्मांमध्ये यथायोग्य व्यवहार करणारा आणि यथायोग्य झोपने व जाग्रण करणारे योगीला हा योग सांसारिक दु:खांचा नाश व हरण करणारा असतो ||17|| पूर्णपणे ताब्यात आणलेले चित्त जेव्हा अध्यात्मामध्ये पूर्णपणे स्थिर होतो तेव्हा सर्व भोगांची इच्छा नाहीशी झालेल्या अशा व्यक्तीला योगयुक्त म्हटला जातो ||18|| ज्याप्रमाणे वारा नसलेल्या जागी दिव्याची ज्योत हालत नाही, तीच उपमा परमात्मेच्या (ॐ) ध्यानात निरंतर युक्त (मग्न) झालेल्या योगीच्या जिंकलेल्या चित्ताला दिली गेली आहे ||19|| ज्या अवस्थेत योगाच्या अभ्यासाने नियमन केलेले चित्त सर्व (ऐहिक) विषयांपासून दूर जातात आणि ज्या स्थितीत विशुद्ध झालेल्या चित्त आत्म्याचे दर्शन करून करून आत्मामध्येच संतुष्ट राहतो ||20|| त्या वेळी फक्त बुद्धीने प्राप्त होणारे इंद्रिया नित्य (परम आनंद) सुखाचा अनुभव घेतात आणि ज्यामध्ये स्थित राहून व प्राप्त करून ते आत्मस्वरूपापासून कधीच भ्रष्ट (विचलित) होत नाही||21||जे (आनंद) लाभ प्राप्त झाल्यामुळे त्याहून अधिक दुसरे कोणतेही (भौतिक) लाभ ते मानत नाही आणि ज्या अवस्थेत असलेला योगी फार मोठ्या (सांसारिक) दु:खाने सुद्धा विचलित होत नाही ||22|| आणि जो संसाराच्या (व शरीर) संसर्ग (उत्पन्न) आणि विनाशरूपी दुखा:ने सुद्धा रहित आहे , त्यालाच “योग” व वास्तविक मुक्ती म्हटले जाते ||23|| ते योग-अभ्यास न कंटाळता अर्थात धैर्य व उत्साह युक्त चित्ताने निश्चयाने अवश्य केला पाहिजे .नंतर मानसिक संकल्पाने उत्पन्न होणारे सर्व कामना पूर्णपणे टाकून देऊन आणि मनानेच इंद्रिय समुदायाला सर्व बाजूनी पूर्णतया आवरून ||24|| क्रमाने अभ्यास

करीत उपरत व्हावे ,तसेच धैर्ययुक्त आणि बुद्धीयुक्त मनाला परमात्म्यात स्थिर करून दुसरे कोणतेही विचार मनात येऊ देऊ नये ||25|| हे स्थिर न राहणारे चंचल मन ज्या ज्या शब्दादि व सांसारिक विषयांत भरकट असते, त्या त्या विषयांपासून मनाला निश्चित आवरून वारंवार परमात्म्यात स्थिर करावे ||26|| कारण ज्याचे मन पूर्ण शांत आहे ,जो पापरहित आहे आणि ज्याचे रजोगुण शांत (मन लोभ व इच्छारहित) झालेला आहे, अशा या सच्चिदानंद ब्रह्माशी ऐक्य पावलेल्या योगीला उत्तम (आत्म) आनंद प्राप्त होतो ||27||

## समबुध्दी

तोच निष्पाप योगी निरंतर आपल्या आत्म्याला परमात्म्याशी जोडून सहजपणे परब्रह्म अशे अपार आनंदाचा अनुभव घेतो ||28|| तोच योगयुक्त व्यक्ती सर्व (जीव) प्राणीमात्रांमध्ये स्थित मला पाहतो आणि नंतर तसेच सर्व प्राणीमात्रांना माझ्यात (परमात्म्यात) स्थित असलेला पाहतो. तोच आत्मसाक्षातकारी मला सर्वत्र सम दृष्टीने पाहणारा आहे ||29|| जो सर्व प्राण्यात आत्मा असलेल्या पाहातो आणि सर्व प्राण्यांना मज वासुदेवात पाहतो, असे माणसाला मी अदृश्य असत नाही आणि तो सुद्धा मला अदृश्य असत नाही ||30|| जो सर्व प्राणीमात्रामध्ये स्थित परमात्म्याला ,एकरूप तत्वामध्ये स्थित असलेला मला (सच्चिदानंद वासुदेवाला) निरंतर भजतो, तो सर्व प्रकारे (परिस्थितीत) स्थित होऊन, तो योगी सदैव माझ्यातच राहत असतो ||31|| हे अर्जुना ! जो आपल्या स्वत:चे तुलनेने सर्व प्राण मात्रांना समदृष्टिने पाहतो, तसेच सर्व जीव मात्रांचे सुख आणि दु:खालाही समदृष्टिने सर्वत्र पाहत असतो ,तोच योगी माझ्या मता प्रमाणे श्रेष्ठ आहे ||32|| मनाची चंचलता-अर्जुनाचा प्रश्न ।।

## अर्जुन म्हणाला

हे मधुसुधना ! जो योगपध्दती मार्ग तुम्ही सांगीतला आहे ,तो मन चंचल

असल्यामुळे नित्य स्थिर राहेल ,असे मला वाटत नाही ||33|| हे श्रीकृष्णा ! कारण हे मन चंचल , क्षोभ देणारे, मोठे दृढ आणि बलवान आहे. त्यामुळे त्याला वश करणे मी वायुला अडवण्या प्रमाणे अत्यंत कठीण समजतो ||34||

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

हे महाबाहो ! यात संशय नाही की हे मन चंचल आणि कठीणानी वंश मध्ये होणारा आहे , परंतु हे कुन्तीपुत्रा ! अभ्यास आणि वैराग्याने सुद्धा मनाला वश करणे शक्य आहे ||35|| असंयत मन असणारे माणसाला योग साधने कंठीन आहे ,किंतु मन वंशमध्ये ठेवणारा अशा प्रयत्नशील माणसाला साधनेने ते (परमात्माचे ध्यान) प्राप्त होणे शक्य आहे, असे माझे मत आहे ||36|| अर्जुनाची जिज्ञासा वाढली ||

## अर्जुन म्हणाला

हे कृष्णा ! जो योगावर श्रध्दा ठेवणारा आहे परन्तु संयमी नसल्यामुळे व ज्याचे मन अंतकाळी योगापासून विचलित झाले आहे, असा साधक योगसिध्दिला (भगवद साक्षात्काराला) प्राप्त न होता कोणत्या गतीला जातो? ||37|| हे महाबाहो ! (आत्मसाक्षातकार) ब्रह्म प्राप्तीच्या मार्गात मोहित आणि आश्रयरहित असलेला योगी छिन्न भिन्न ढगाप्रमाणे दोन्हीकडून नष्ट-भ्रष्ट होऊन नाश (नरक) तर नाही ना पावत ? ||38|| हे कृष्णा ! हा माझा संशय तुम्हीच पूर्णपणे नाहीसा केला पाहिजे. कारण तुमच्यावाचून दुसरा हा संशय दुर करणारा ह्या जगात कोणीही मिळणे शक्य नाही ||39||

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

हे पार्थ ! त्या माणसाचा ना इहलोकात नाश होतो व ना परलोकात. कारण हे तात! कल्याणकारी कर्म करणारा कोणीही मनुष्य अधोगतीला जात नाही ||40|| योगभ्रष्ट योगी पुण्यवान लोकांना मिळणारे (उच्च)

लोक अर्थात स्वर्गादि उत्तम लोकात जाऊन तेथे पुष्कळ वर्ष राहून नंतर शुध्द आचरण असणारे श्रीमंत लोकांचे घरात जन्म घेतात ||41|| किंवा वैराग्यशील व्यक्ती त्या लोकात न जाता ज्ञानी योग्यांचे घरात जन्म घेतात, त्या प्रकारचे जन्म या जगात नि:संदेह अत्यंत दुर्मिळ आहे ||42|| हे कुन्तीनंदन ! ते योगभष्ट पूर्वजन्मात संग्रह केलेल्या बुद्धी संयोग व संस्कार सहजच प्राप्त करतो आणि त्याच्या प्रभावाने तो पुन: परमात्मा प्राप्ति रूप सिद्धीसाठी पूर्वीपेक्षा अधिक प्रयत्न करतो ||43|| तो श्रीमंत घरात जन्म घेणारा योगभष्ट पराधीन असला तरी तो आपल्या पूर्व जन्माच्या अभ्यासामुळे नि:शंकपणे भगवंताकडे आकर्षित होतो आणि पुन: योगांच्या विषयात पुर्ण जिज्ञासा झाल्यावर तो वेदांतात सांगितलेल्या सकाम कर्मफलांना ओलांडून जातो ||44|| परंतु अभ्यास करणारा योगी तर मागील अनेक जन्माच्या संस्काराच्या जोरावर ह्याच जन्मात पूर्ण सिद्धी मिळवून आणि सर्व पापानी मुक्त होऊन तत्काल परम गतीची प्राप्ति करतो ||45|| तपस्वी ,ज्ञानी आणि कर्मीपेक्षा योगी (भगवद् उपासक) अधिक श्रेष्ठ आहेत .म्हणून हे अर्जुना ! तू सर्व परस्थितित योगी हो ||46|| सर्व योग्यांत जो श्रद्धावान योगी माझ्या ठिकाणी (भक्तीयोगे द्वारा) स्वत:चे अंतरात्म्याला स्थापन करून मला नित्य निरंतर अखंड भजतो ,तोच योगी मला सर्वात श्रेष्ठ वाटतो ||47||

*******************************************************************************

# ज्ञानविज्ञान योग

---

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

हे पार्थ ! अनन्य प्रेमाने मनाला पुर्णपणे माझ्या ठिकाणी आसक्त करून ,तसेच योग-अभ्यास करीत आणि माझेच आश्रय घेत संपूर्णपणे (माझे ऐश्वर्य, सर्वांचा आत्मा असे) नि:शंयपणे मला कसे जाणून घेशील, ते आता ऐक ||1|| ते ज्ञान मी तुला (दिव्य) विज्ञानासह संपूर्ण सांगेन ,जे जाणले असता या जगात पुन्हा दुसरे काहीही जाणण्यायोग्य शिल्लक राहत नाही ||2|| हजारो मनुष्यांपैकी एखादाच कोणी सिद्धीसाठी यत्न (प्रयत्न) करतो आणि त्या सिद्धी प्राप्त करणाऱ्यांपैकी एखादा कोणी तरी (मत् परायण होऊन) मला तत्वत: (माझ्या खरे स्वरुपाला) जाणतो ||3||

## ईश्वर व त्याची प्रकृती

पृथ्वी, पाणी ,अग्नी, वायू, आकाश, मन, बुद्धी आणि अहंकार याप्रमाणे अशी ही आठ प्रकारने विभागलेली निश्चित केलेली माझी अशी "प्रकृती" (शक्ती) आहे ||4|| हे महाबाहो ! हिच्याहून दुसरी, जिच्यात सर्व जीवांचा समावेश आहे. ते जीव (आपल्या इंद्रियांने) ज्या भौतिक (जग) प्रकृतीचा उपभोग घेतात, ती माझी परा प्रकृती (माया शक्ति) समज ||5|| सर्व (जीव) भूतमात्रा माझ्या या दोन प्रकृती पासून उत्पन्न झालेले आहेत. मीच ह्या संपूर्ण सृष्टिचे उत्पत्ति आणि प्रलयकर्ता आहे ||6|| हे धनंजया ! माझ्यापेक्षा श्रेष्ठ दुसरे कोणतेही परम तत्व (कारण) अस्तित्वात नाही आहे .दोरात अनेक मनी ओवलेले असतात ,तसेच माझ्यात हे संपूर्ण जग ओवलेले आहेत ||7|| हे अर्जुना ! मी पाण्यातील रस आहे, चन्द्र-सूर्याचा प्रकाश आहे, तसचे सर्व वेदांतील एकाक्षर (ॐ) ओंकार, आकाशातील शब्द आणि मनुष्यांमधील पुरूषत्व मीच आहे ||8|| मी पृथ्वीचा पवित्र

गंध आहे आणि अग्निचा तेज आहे. तसेच सर्व भूतांची (चेतना) जीवन शक्ति आणि तपस्व्यांचे तप आहे ||9|| हे पार्थ ! तू सर्व (जर-अचर) प्राणीमात्रांचे बीज (उत्पत्तिचे स्थान) ,सनातन (शाश्वत) मलाच समज. मी बुद्धिमानांची बुद्धि आणि तेजस्वी लोकांचे (महापुरूषांचे) तेज आहे ||10|| हे भरतश्रेष्ठा ! मी बलवानांचे आसक्तिरहित व कामनारहित बल आहे आणि धर्मत्व विरूद्ध नसणारा सर्व प्राण्यांतील (संतती उत्पन्न करणायाची इच्छा) कामही मीच आहे ||11||

## प्रकृती स्वरूप

जे काही सात्विक भाव समूह आहेत, राजस आणि तामसी भाव समूह आहेत ते सर्व प्रकृतीचे गुण-कार्य (दया,क्रोध,हिंसा) आहेत. ते सर्व माझ्यापासून उत्पन्न झाले आहेत ,वास्तविक पाहता त्यांच्यात (स्वभावात) मी राहत नाही, तर ते सर्व भावसमूह माझ्यात ,अधीन (नियंत्रणात) आहेत ||12|| वर सांगितलेल्या त्रिविध गुणयुक्त भावद्वारा हे सर्व जीव (मी राजा, धनी, पुरूष, मी सुंदरी आहे असे) मोहित झाले आहेत त्यामुळे त्रिगुणात्मक प्रकृतीपेक्षाही श्रेष्ठ माझे अशे परम अविनाशी स्वरुपाला (परमात्म्याला) ते जाणीत नाही ||13|| कारण जीवात्म्याला (विमोहिनी) माझी त्रिगुणात्मक माया (शक्ती) पार होण्यास दुरूस्त आहे, परंतु जे केवल माझेच (श्रीकृष्णचे) शरणागत होतात ते या (दुखरूपी) मायेला सहज तरून जातात ||14|| मायेने ज्यांचे ज्ञान हिरावून घेतले आहेत, (अंहकारी) असे आसूरी स्वभावाचे व मनुष्यांत नीच असणारे ,दुष्ट कर्मे करणारे मूर्खलोक माझ्या शरणात येत नाही ||15||

## भक्तांचे प्रकार

हे भरतवंशी यांमध्ये श्रेष्ठ अर्जुना ! उत्तम कर्मे करणारे अर्थार्थी ,आर्त, जिज्ञासु आणि ज्ञानी असे चार प्रकारचे पुण्यात्मा भक्त माझी भक्ती करता ||16|| त्यापैकी नित्य माझ्यात एकाग्रचित्त आणि एकमात्र भावनेने

माझ्यात स्थित असलेल्या ज्ञानी भक्त श्रेष्ठ आहेत .कारण त्या ज्ञानी माणसाला मी अत्यंत प्रिय आहे आणि तेही मला अत्यंत प्रिय आहेत ||17|| ते सर्वच उदार आहेत परंतु ज्ञानी (मला जाणणारे) तर साक्षात माझे आत्म स्वरूपच आहेत. असे माझे मत आहे. कारण ते निश्चित होऊन सर्वोत्तम गती स्वरूप माझेच (सर्वप्रकारे) आश्रय घेतात ||18|| "सर्व काही वासुदेवमय आहे" - याप्रकारे ज्ञानसम्पन्न होऊन व्यक्ती अनेकानेक पुन: पुन्हा जन्म-मृत्यू घेतल्या नंतर माझे आश्रय स्वीकारतात ,असे महात्मे (ह्या जगात) खरच दुर्लभ आहेत ||19|| ज्या कामाने (भोग इच्छाने) ज्यांचे ज्ञान हिरावलेले आहे. असे लोक देवतांची निरनिराळे नियम पाळून आपल्या प्रकृतीने (स्वभावाने) प्रेरित व वंश झालेले विधिविधानांचे पालन करतात ||20|| तो ज्या देवतांचे श्रद्धापूर्वक पूजन करू इच्छितो ,निश्चितपणे मी अंतर्यामी रूपात त्या त्या देवी-देवतांचे प्रति त्यांची श्रध्दाला दृढ करतो ||21|| तो श्रद्धेने त्या देवतांचे पूजन करतो आणि त्या देवते कडून केवल मीच ठरविलेले इच्छित भोग त्यांना (देवी-देवतांकडून) मी निश्चित प्रदान करतो ||22|| पण त्या मंद बुद्धी लोकांचे ते फल नाशिवंत व अनित्य असतात. देवतांची पूजा करणारे देव लोकात जातात परंतु माझे भक्तगण तर (कायमचे) माझ्या नित्य परम धामाला जातात आणि मलाही मिळवतात ||23|| मूढ लोक माझ्या सर्वश्रेष्ठ, अविनाशी अशा परम भावाला न जाणता मन-इंद्रियांच्या (प्रकृतीच्या) पलीकडे असणारे (सच्चिदानंद परमात्मस्वरूप) मला मनुष्य प्रमाणे जन्म घेऊन प्रकट झालेला मानतात ||24|| कारण स्वतःच्या योग-मायेत लपलेल्या मी सर्वांना प्रत्यक्ष दिसत नाही. म्हणून ते अज्ञानी लोक जन्म नसलेल्या ,अविनाशी मला परमेश्वराला ते जाणू शकत नाही. (अर्थात मनुष्याप्रमाणे मला जन्म घेणारा व मरणारा समजतात) ||25|| हे अर्जुना !

पूर्वी होऊन गेलेल्या, वर्तमान काळात असलेले आणि भविष्यकाळात घडणारे व सर्व प्राणीमात्राना सुद्धा मी जाणतो. पण मला कोणीही (देवगण सुद्धा पूर्णपणे) जाणत नाही ||26|| हे परंतपा अर्जुना ! सृष्टित इच्छा आणि द्वेष यामुळे उत्पन्न झालेल्या (सुख-दु:खरूप) द्वंद्वांच्या मोहामुळे हे भारत ! सर्व जीव (दु:ख रूप संसारात पुन: पुन्हा) मोहामध्येच जन्म घेतात आणि जातात ||27|| परंतु ज्याचे सर्व पाप (परमात्माच्या ज्ञानाने) नष्ट झाले आहेत आणि ज्या लोकांनी पूर्वजन्मी पुण्यकर्म केली आहेत, ते राग द्वेषाने उत्पन्न होणारे द्वंद्वस्वरूप आणि मोहापासून मुक्त झालेले भक्तगण मला दृढ-निष्ठेने सर्व प्रकारे माझीच भक्ती करीत असतात ||28|| जे वार्धक्य व मरण (जन्म-मृत्यू) यापासून मुक्त होण्याकरिता माझे आश्रय घेतात, तेच ब्रह्म आहेत. कारण तेच सर्व काही आध्यात्मिक (दिव्य) ज्ञान आणि संपूर्ण कर्मे जाणतात ||29|| जे सर्वत्र मला अधिभुतांचे संचालक ,अधिदैवांचे (देवी-देवतांचे) नियंत्रक, सर्व यज्ञांचे अधिष्ठाता (यज्ञ हेच विष्णु) असे जाणतात आणि नित्य माझ्यात (नामस्मरणात, ज्ञानात) आसक्त चित असल्यामुळे ते मला अंतकळाही जाणतात (व तोच मृत्यूच्या वेळी मला स्मरण करू शकतात) ||30||

*******************************************************

**"प्रकृति, श्रीलक्ष्मी श्रीकृष्णच्या नियंत्रणा खाली कार्य करत असते, माझ्या व मनुष्यच्या नियंत्रणात आहे बोलने अज्ञान व दुखकारक आहे"**

# अक्षरब्रह्म योग

---

## अर्जुन म्हणाला

हे पुरूषोत्तमा ! ब्रह्म काय आहे ? अध्यात्म म्हणजे काय ? अधिदैव (देवता) कोण आहेत आणि अधिभूत (भौतिक सृष्टि) कसे आहे ? (सकाम) कर्म काय व कसे आहे? ||1|| हे मधुसूदना ! या शरीरामध्ये राहणारा अधियज्ञ कोण आहे ? अंत व मृत्यूच्या वेळी आत्मसंयमी (योगी) आपल्याला कसे काय जाणू (व प्राप्त करू) शकतात ? ||2||

## श्रीभगवान म्हणाले

दिव्य अक्षर (अविनाशी) परम तत्व "ब्रह्म" (जीव) आहे आणि नित्य (शाश्वत) स्वभावाला "अध्यात्म" असे म्हणतात, तसेच जीवांचे शरीराची उत्पत्ति व वृद्धिला कारणीभूत जो विसर्ग (सृष्टि व्यापार) आहे ,त्याला सकाम "कर्म" असे म्हणतात ||3|| सर्व नाशवंत शरीर व पदार्थ " अधिभूत" आहे, तसेच त्या विराट पुरूषाला (ज्यात सर्व देवांचे समावेश आहे) "अधिदैव" व देवतांचे अधिपति असे म्हणतात आणि हे अर्जुना ! निश्चयी मी सर्वांच्या शरीरात राहणारा व देहधारी जीवात्म्यात श्रेष्ठ "अधियज्ञ" (सर्व यज्ञांचा स्वामी) म्हणजे परमात्मा या रूपाने अधिष्ठित आहे ||4|| जो अंतकाळी माझेच स्मरण करीत शरीराचा त्याग करून जातो व देह प्रयाण करतो, तो साक्षात माझी (दिव्य) प्रकृतीची (वैकुण्ठ धामाची) प्राप्ती करतो ,यात मुळीच संशय नाही ||5||

## अंतकाळची मन:स्थिति व गति

हे कौन्तेय ! जो मृत्यूच्या वेळी कोणत्या (आवडत्या) भावाचे तो स्मरण करतो. सर्वदा त्याच भावेचे स्मरण करीत असल्याने ते भाव (व त्याप्रकारचे शरीर व देह) त्याला निश्चित (मृत्यूनंतर) प्राप्त होते ||6|| म्हणून

हे अर्जुना ! तू सर्वकाळही निरंतर माझेच स्मरण कर आणि युद्ध ही कर. अशा प्रकारे माझ्या ठिकाणी मन ,बुध्दी अर्पण केल्यामुळे तू नि:संशय (युद्धात मारला गेलास तरी) मलाच प्राप्त होशील ||7|| हे पार्थ ! असा नियम आहे की ,परमेश्वराच्या ध्यानाच्या अभ्यासरूपी योगाने युक्त, अन्य दुसरीकडे न जाणारा चित्त निरंतर त्या दिव्य परम (सर्वश्रेष्ठ) पुरूषांचे चिंतन करीत करीत त्यालाच (परमेश्वराला) प्राप्त करतो ||8|| जो सर्वज्ञ ,सनातन ,अनादी, सर्वांचा नियामक, सूक्ष्म हून अति सूक्ष्म, सर्वाचे धारण पोषण करणारा, सूर्याप्रमाणे (स्वयं) प्रकाशित आणि (त्रिगुणात्मक) भौतिक प्रकृतीच्या पलीकडे असलेल्या त्या परम पुरूषाचे निश्चल अशा सच्चिदानंद परमेश्वराचे नित्य स्मरण करतो ||9|| तसेच जो मृत्युच्या वेळी एकाग्र मनाने आणि भक्तीयुक्त होऊन आपल्या योगबलाने दोन्ही भुंवयांच्या मध्यभागी (ॐ) प्राण चांगल्या रीतीने स्थापना करून मग निश्चल मनाने त्या परम पुरूषाचे जो स्मरण करतो ,तो निश्चित त्या परम दिव्य पुरूषाची (भगवंताची) प्राप्ती करतो ||10||

## परब्रह्माचा विचार

वेदांत ज्ञानी ज्याला अविनाशी ॐ कार स्वरूप असे म्हणतात, वासनारहित संन्यासाश्रमी महर्षी ज्यात प्रवेश करतात आणि ज्याला प्राप्त करण्यासाठी ब्रह्मचारी लोक ब्रह्मचर्य रुपी कठोर व्रताचा पालन करतात ,त्या प्राप्य वस्तु बदल थोडक्यात मी तुला सांगतो ||11|| सर्व इंद्रियांचे प्रवेश द्वारा बंद करून, हृदयांत मन एकाग्र करून, प्राणवायुला भ्रूमध्ये (दोन्ही भुवनांचे मध्ये) स्थिर करून ||12|| नंतर योग अभ्यासात मन स्थिर झाल्यावर ,परम पवित्र अशा ओम "ॐ" या शब्दाचा उच्चारण करत आणि भगवंताचे ध्यान करत करत आपले शरीर सोडले की तो निश्चितच परम (लक्ष्य) गतीची (अक्षर धामाची) प्राप्ती करतो ||13|| हे पृथापुत्रा ! जो योगी अन्य भावना (कामना) शून्य होऊन दररोज, निरंतर

माझे स्मरण करतो ,असे नित्य युक्तयोगीला मी सहजच प्राप्त होतो ||14|| असे महात्मे एकदा मला प्राप्त केल्यानंतर पुन्हा कधीच असे नित्य दु:खांचे स्थान असलेल्या क्षणभंगुर आणि अनित्य (शरीरात) जन्म घेत नाही. कारण ते महात्मा लोक परम सिद्धीला (माझ्या नित्य धामाला) प्राप्त झालेत ||15|| ब्रह्मलोक (उच्चतम लोक) पासून ते सर्वात खालच्या लोकापर्यंत (पाताळ लोक) जेवढे ग्रहलोक आहेत त्यात जीव वारंवार जन्म- मृत्यूलाच प्राप्त होतात. परंतु जो एकदा मला प्राप्त करतो तो (संसारामध्ये) पुन: जन्म घेत नाही ||16||

## ब्रह्म देवाचा कालावधी

मनुष्य लोकांतील हिशोबा प्रमाणे, एक हजार चतुर्युगाचे काळ संपल्यावर ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो आणि तसेच एक हजार चतुर्युगाचे काळ हे ब्रह्मदेवाची एक रात्र असते ||17|| जेव्हा ब्रह्मदेवाचा एक दिवस प्रकट होतो तेव्हा हे सर्व जीवसमुदाय अव्यक्त कारणस्वरूप (बीज) पासून प्रकट होतात आणि जेव्हा ब्रह्मदेवाची रात्र प्रारंभ होते तेव्हा ते सर्व जीव त्याचप्रकारे अव्यक्त कारणस्वरूपात लीन होतात ||18|| हे पृथापुत्रा ! वारंवार दिवस होतो आणि हे सर्व जीव समुदाय अस्तित्वात येतात आणि नंतर पुन्हा रात्र होते आणि मग हे सर्व जीव आपोआप नि:सहाय होऊन नाश पावतात ||19|| परंतु त्याहून दुसरी एक सनातन (शाश्वत) अशी प्रकृती आहे जी या व्यक्त (दृश्य) आणि अव्यक्त (अदृश्य) पदार्थांच्या पलीकडची आहे, ती श्रेष्ठ आहे. संपुर्ण जगाचा नाश झाले तरी ती (दिव्य) प्रकृती कधीही नष्ट होत नाही ||20|| त्या परम धामाला अव्यक्त (अप्रकट), अविनाशी (नित्य) आणि परम गती (श्रेष्ठ प्रवास) असे म्हटले आहे. जीवात्मा जेव्हा तेथे जाऊन पोहोचतो तेव्हा तो कधीच (ह्या दु:खरुपी जगात) परत येत नाही .असे माझे परम दिव्य (कृष्ण) धाम

(निवास स्थान) आहे ||21||

## उत्तरायण व दक्षिणायन मार्ग

हे पार्थ ! ज्या परमात्माच्या ठिकाणी सर्व भूते (जीव) राहतात आणि ज्या सच्चिदानंद परमात्म्याने हे संपूर्ण जग (सुक्ष्मरूपाने) व्यापून राहले आहे ,तो सनातन (शाश्वत), परम पुरूष फक्त अनन्य भक्तीनेच प्राप्त होणारा आहे ||22|| हे अर्जुना ! ज्या काळी (मार्गात) देहाचा त्याग केला की, योगी संसारात पुन: जन्म व परम गतीला (मोक्ष) प्राप्त करतो, ते काळ अर्थात असे दोन मार्ग मी तुला सांगतो ||23|| ज्या मार्गात अग्नी, ज्योति (दिवसा), शुभदिवस, शुक्ल पक्ष त्या सहा महिन्यात, उत्तरायणाच्या वेळी त्या मार्गात मेळ्यावर (व देहाचा त्याग केला की) तो (जीव) ब्रह्मज्ञानी वरील देवतांकडून क्रमाने नेले जाऊन परब्रह्मला प्राप्त करतो ||24|| ज्या मार्गात धूम ,रात्री ,कृष्ण पक्ष त्या सहा महिन्यात दक्षिणायनाच्या वेळी व मार्गात मेळ्यावर कर्मयोगी चंद्रलोक व ज्योति स्वरूप स्वर्ग प्राप्त करून परत येतो (मनुष्य लोकात पुन: जन्म घेतो) ||25|| शुक्ल (प्रकाश) आणि कृष्ण (अंध:कार) निश्चित भौतिक जगाचे असे दोन सनातन मार्ग (यजुर) वेदांतात सांगितले ,एका मार्गाने मोक्ष प्राप्त होतो तर दुसरे मार्गात मेळ्यावर संसारात पुन: जन्म (व दुख) होतो ||26|| हे पार्थ ! या दोन्ही मार्गांचे तत्व जाणून कोणीही योगी मोह पावत नाही .म्हणून हे अर्जुना ,तू सर्वदा समतत्वयुक्त योगपरायण हो ||27|| (भक्ती) योगीलोक हे रहस्याला तत्वत: जाणून ,वेदांचे पाठ, यज्ञ, तप, दान इत्यादि (वैदिक) कर्मशास्त्रामध्ये जे (स्वर्ग प्राप्तरूपी) पुण्यफल सांगितले आहेत ,ते सर्व कर्मफलांना तो नि:संशय ओलांडून (सोडून) जातो आणि सनातन (शाश्वत) परम ,अप्रकृत (सहा विकारातून मुक्त), नित्य अशा दिव्य स्थानाला (कृष्ण धामाला) तो प्राप्त करतो ||28||

# राजविद्याराजगृह्य योग

---

## श्रीभगवान म्हणाले

हे अर्जुना ! दोषदृष्टि रहित ,अतिशय गोपनीय ज्ञान (परमेश्वरीय) विज्ञान सहित (केवला शुद्ध भक्तीयुक्त असे ज्ञान) तुला पुन्हा मी नीटपणे सांगतो. ते जाणल्याने तू या दुख:रूपी संसारातून (कायमचा) मुक्त होशील ||1|| ते (परमेश्वर प्राप्तीचे ज्ञान) विज्ञान सहित ज्ञान सर्व विद्याचा राजा, सर्व गुप्त गोष्टींचा राजा, अतिशय पवित्र (पापातून मुक्त करणारा) ,अतिशय उत्तम ,प्रत्यक्ष शीघ्र फल देणारे, धर्मयुक्त ,साधन करण्यास फार सोपे आणि अविनाशी आहे ||2|| हे परंतपा ! या भक्तीस्वरूप धर्मावर श्रद्धा नसलेले लोक मला प्राप्त न करता ते लोक पुन: मृत्यू (दुख) रूपी संसार (जन्म-मृत्यूच्या) मार्गावर परत येतात ||3|| मी निरंकार परमात्म्याने हे समपूर्ण जग अव्यक्त (सुक्ष्म) रूपाने व्यापले आहे आणि सर्वभूत (जीव) माझ्यामध्ये फक्त (शक्ति) संकल्पाच्या आधारावर राहलेले आहेत. परंतु वास्तविकपणे मी त्यांच्यात (नियंत्रणा खाली, स्वभावात) राहत नाही ||4|| परंतु माझी ईश्वरी योगशक्ती पहा, भुतांना (जीवांना) उत्पन्न करणारा व त्यांचे धारण Ðपोषण करणारा असून सुद्धा वास्तविकपणे मी त्या भुतांच्या ठिकाणी (अधीन व अनियंत्रणा) राहत नाही, कारण मीच सर्व सृष्टीचा (व जीवांचे) उगम (परम) स्थान आहे ||5|| जसे सूक्ष्म वायु आकाशा पासून उत्पन्न होऊन सर्वत्र फिरणारा नेहमी आकाशातच (वेगळा) राहतो ,त्याच प्रमाणे माझ्या संकल्पाने उत्पन्न झालेले सर्व भुते (जीव) माझ्यातच स्थित आहेत असे तू समज ||6||

## प्रकृतीत सृष्टिचा विलय

हे अर्जुना ! प्रलय काळी सर्व भुते माझ्या प्रकृतीमध्ये विलीन होतात

आणि पुन: सृष्टिकाळी (आरंभी) मी त्यांचे विशेष भावानी पुन: स्थापना करतो ||7|| आपल्या मायेच्या अंगीकार करून प्रकृतीच्या ताब्यात असल्यामुळे पराधीन झालेल्या त्या सर्वभूत (जीव) समुदायाला मी वारंवार त्यांच्या (पूर्वजन्मी केलेले) कर्मा अनुसार उत्पन्न करतो ||8|| हे धनंजया (अर्जुना) ! त्या कर्मात आसक्ति नसलेल्या व उदासीन (तटस्थ) प्रमाणे स्थित मला (परमात्म्याला) ते कर्मे बंधनकारक होत नाहीत ||9|| हे कौन्तेया ! माझ्या अध्यक्षतेत खाली ही भौतिक प्रकृतीसह चराचर हे संपूर्ण जग प्रकट होते आणि ह्याच कारणामुळे हे जग पुन: पुन्हा उत्पन्न होत (व कार्य करीत) आहे ||10|| माझ्या परम भावाला न जाणणारे मूर्ख लोक व मायिक मनुष्य शरीर धारण करणारा मला सामान्य मनुष्य समजतात. ते लोक दिव्य आणि सर्व भूतांचा (मालक) महेश्वर (परमेश्वर) माझ्या असे अविनाशी स्वरुपाला जाणत नाहीत ||11|| ज्यांची आशा व्यर्थ ,कर्म निरर्थक आणि निष्फल व ज्ञान फुटके असे मोहित ,विक्षिप्त नास्तिकवादी मतांकडे चित्त असलेले अज्ञानी लोक राक्षसी, असुरी (अंहकार) आणि मोहिनी प्रकृतीचे आश्रय करून राहतात ||12|| परंतु हे कुन्तीपुत्रा ! दैवी प्रकृतीच्या आश्रय घेतलेले महात्मे मला सर्व भुतांचे सनातन कारण आणि अविनाशी अशे अक्षरस्वरूप जाणुन अनन्य (इच्छारहित) चित्ताने युक्त होऊन ते निरंतर मलाच भजतात ||13|| ते दृढ निश्चयी भक्त निरंतर माझ्या नामांचे व गुणांचे कीर्तन करीत माझ्या प्राप्तीसाठी प्रयत्न करीत नेहमी माझ्या ध्यानात मग्न होऊन अनन्य प्रेमाने माझी उपासना (व नामस्मरण) करण्यामध्ये मग्न असतात ||14|| अन्य काही जण (वेद,गीता, पुराण,स्तोत्र पाठ) ज्ञानयज्ञाद्वारा यज्ञ करतात, कोणी अभेद भावनेने ,पृथकत्वानें, नाना (देवतांचे) रुपांनी आणि (विराट) सर्वतोमुख या रूपानी (माझी) उपासना करतात ||15|| हे

अर्जुना ! श्रौत (अग्निष्टोमादि) यज्ञ मी आहे, स्मार्त्त (स्मृति विहित) वैश्वदेवादि यज्ञ मी आहे, पितृयज्ञ मी आहे, वनस्पती, अन्न व औषधी मी, मंत्र मी , तूप मी अग्नी मी ,होम मीच आहे ॥16॥ मीच या जगाचे आई-वडील धाता आणि आजोबा आहे, मीच ज्ञेय (जाणण्या योग्य), पवित्र करणारा (म्हणजे सर्व पापांचे नाश करणारा) ॐ कार (एकाक्षर) आहे, तसेच ऋग्वेद, सामवेद आणि यजुर्वेदही मीच आहे ॥17॥ प्राप्त होण्यासारखे परम धाम, भरण पोषण करणारा, सर्वांचा स्वामी, शुभाशुभ पाहणारा, सर्वांचे निवासस्थान , शरण देणारा, प्रत्युपकाराची इच्छा न करता हित करणारा, सर्वांच्या उत्पत्ति , प्रलयाचे कारण , स्थिती, आधार, निधान आणि अव्यय बीज (उत्पत्तिचे स्थान) मीच आहे ॥18॥ मीच सूर्याच्या रूपाने उष्णता देतो, पाणी आकर्षण करून घेतो व वर्षाव करतो. हे अर्जुना ! मीच अमृत आणि मृत्यू आहे. सत् (सत्य) आणि असत् (अशुभ, मिथ्या) वस्तुही मीच आहे ॥19॥

## स्वर्ग प्राप्ती व पुनर्जन्म

तिन्ही वेदांतात सांगितलेले सकाम (भोग-इच्छेसाठी) कर्मे करणारे ,सोमरस पिणारे , पापमुक्त लोक माझे (ब्रह्मस्वरूप) यज्ञांचे पूजन करून स्वर्गं प्राप्तीची इच्छा करतात. ते इन्द्रलोक (स्वर्ग) पुण्यफल प्राप्त करून दिव्य आनंद देणारे भोगांचे ते उपभोग घेतात ॥20॥ ते त्या विशाल स्वर्ग लोकांच उपभोग घेत पुण्य संपल्यावर ते मृत्यू लोकात (संसारात) पुन: येतात. अशा रीतीने (स्वर्ग प्राप्तीचे साधन असणारे) तिन्ही वेदांमध्ये सांगितलेल्या सकाम Đकर्मांचे व धर्माचे (यज्ञांचे) अनुष्ठान करून ते इंद्रिय विषयरूपी भोगांची इच्छा करणारे लोकं पुन: पुन्हा: ह्या (दुखरूपी) संसारामध्ये जन्म आणि मृत्यूलाच प्राप्त होतात ॥21॥ पण जे अनन्य कामनारहित भक्त मज परमेश्वराला नित्य निरंतर चिंतन करीत सर्वोत

भावनेने भजतात ,त्या एकनिष्ठ भक्तांचा योग म्हणजे धन-धाण्यादि सर्व गरजा मी स्वतः त्यांना वाहून (प्राप्त करून) देतो आणि क्षेम म्हणजे प्राप्त झालेल्या वस्तुंचा रक्षण करतो ||22|| हे अर्जुना ! जे सकाम भक्त श्रेध्देने दुसरे देवतांची पूजा करतात ,तेही माझीच (अंशाची) पूजा करतात .परंतु त्यांचे ते पूजन अविधिपूर्वक (अशास्त्रीय मार्गांनी) चुकीचे असते ||23|| कारण सर्व यज्ञांचा (फलांचा) भोक्ता आणि स्वामी मीच आहे. पण ते मला परमेश्वराला तत्वतः जाणत नाहीतः म्हणून ते पुनः (दुखस्वरूप) जन्म घेतात ||24|| देवतांची पूजा करणारे देवतांकडे (स्वर्गादि लोकात) जातात. पितरांची पूजा करणारे पितरलोकात जातात, भूतांची पूजा करणारे भूत-प्रेतांनच्या योनीत जातात आणि माझी पूजा करणारे भक्त मलाच प्राप्त करतात (म्हणून माझ्या भक्तांना पुन:जन्म नाही) ||25|| जो कोणी भक्त मला प्रेमाने पान ,फुल ,फल, पाणी इत्यादि (सात्विक पदार्थ) अर्पण करतो, त्या शुध्द बुद्धीच्या निष्काम भक्तांने अर्पन कलेले सर्व पदार्थ मी ग्रहण (भक्षण) करतो ||26|| हे अर्जुना ! तू जे कर्म करतोस, जे खातोस, जे हवन (यज्ञ) करतोस, जे दान देतोस आणि जे तप करतोस ,ते सर्व कर्म मला समर्पित (माझ्या प्राप्तीसाठी) कर ||27|| अशा प्रकारे तू शुभ व अशुभ फलस्वरूप कर्मबंधनातून मुक्त होशील आणि अशा संन्यास योगानेयुक्त चित्त असलेला तू मुक्त झालेले (शुभ-अशुभ कर्मफल न भोगता) योगीसारखे (मृत्यूनंतर) मलाच येऊन मिळशील ||28|| मी सर्व प्राणीमात्राला समभावाने व्यापून राहलो आहे .मला ना कोणी अप्रिय न प्रिय आहे. परंतु जे भक्त मला प्रेमाने भजतात, ते माझ्यात आसक्त असतात आणि मीही त्यांच्यात त्याच प्रकारे आसक्त (निर्भर) असतो ||29|| जर एखादा अत्यंत दुराचारी (वाईट) माणसाने जर सुद्धा अनन्य भावनेने माझा भक्त होऊन मला भजला, तर त्याला साधुच (सज्जनच) समजावा. कारण

माझ्यात भक्तीयुक्त (परमात्मा शिवाय दुसरे काहीच नाही) निश्चयी बुद्धी त्याची झालेली असते ||30|| तो तत्काळ धर्मात्मा होऊन परम शांती प्राप्त करतो, हे कौन्तेया ! तू असे घोषणा कर (सर्वांना सांगून टाक) की माझे भक्त कधीही नाश पावत नाही ||31|| हे अर्जुना ! नीच (अधम) कुळातली स्त्रिया, वैश्य (व्यापारी,शेतकरी), शूद्र (नौकरशाही), (तसेच मांस खाणारा अर्थात) चाण्डालादी कोणीही असो, ते सुद्धा माझे आश्रय घेऊन (सुखानी) परम गती (सर्वश्रेष्ठ धाम) प्राप्त करू शकतात ||32|| मग पुण्यशील ब्राह्मण तसेच राजर्षि भक्तगण जे माझे आश्रय घेतात ते परम गती प्राप्त करतील, यात कसली शंका आहे ? म्हणुन दुख:रूपी व नाशवंत या मनुष्य शरीराला प्राप्त, तू नेहमी माझेच भजन (नामस्मरण) कर ||33||
माझ्यात (ज्ञानात) मन ठेव, माझा भक्त हो, माझी पूजा (नामस्मरण) कर, मला नमस्कार कर ,अशा रीतीने तू स्वत:च्या आत्म्याला माझ्यात रममाण आणि मत् परायण होऊन तू (मृत्यूच्या वेळी) निश्चित मलाच प्राप्त करशील ||34||

*******************************************************************************************

**" देवाची पुजा करणारे देवलोकात जातात आणि या मृत्युलोकात पुनः येतात, पण जे श्रीकृष्ण धामाची प्राप्ती करतात त्यांचा पुनः  जन्म होत नाही"**

# विभूति योग

---

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

हे महाबाहो अर्जुना ! आणखी निश्चितपणे माझे श्रेष्ठ (परम रहस्यमय प्रभावयुक्त) म्हणने (ज्ञान) पुन्हा एकदा तू ऐक ,जेकी तू अतिशय मला प्रिय असे तुझ्या हितासाठी सांगतो ||1|| माझी उत्पत्ति (लीला व योगमाया द्वारा प्रकट होणे), ऐश्वर्य ना देव जाणतात ना महर्षीगण ही जाणतात.कारण सर्व प्रकारे देवांचे व महर्षिचे मीच आदिकारण (उत्पत्तिकर्ता) आहे ||2|| जे मला वास्तविक जन्मरहित ,अनादि आणि सर्व लोकांचा महेश्वर (महान ईश्वर, परमेश्वर , सर्व जीवांचा मालक) असे तत्वत: जाणतात, तेच ज्ञानी भक्तजन मनुष्यात मोहशून्य होऊन सर्व पापातून मुक्त होतात ||3||

## विभूतियोग

निर्णय शक्ति, यथार्थ ज्ञान ,असमूढता, क्षमा ,सत्य इन्द्रियनिग्रह, मनोनिग्रह, सुख , दु:ख उत्पत्ति, प्रलय, भय, अभय ||4|| अहिंसा ,समता, संतोष, तप, दान, कीर्ति-अपकीर्ति इत्यादि प्राण्यांचे अनेक प्रकारचे सर्व भाव माझ्यापासूनच उत्पन्न होतात ||5|| सात महर्षिगण, त्यांच्याही पूर्वी असणारे सनकादिक चार कुमार तसेच स्वयंभू इत्यादि चौदा मनु असे माझ्या ठिकाणी असलेले सर्व काही भाव माझ्या संकल्पाने (हिरण्यगर्भ) उत्पन्न झाले आहेत .या जगात ब्राह्मणादि सर्व प्रजा त्यांचीच पुत्र-पौत्रादि (वंशज) आहेत ||6|| जो माणूस माझे या परमेश्वरर्यरूपी विभूतीला (ऐश्वर्य) आणि योग शक्तिला तत्वत जाणतो तो स्थिर भक्तीयोगाने युक्त होतो, यात मुळीच शंका नाही ||7|| मी “वासुदेवच” सर्व जगाच्या उत्पत्तिचे मुळ कारण आहे आणि माझ्यामुळेच

हे सर्व जग क्रियाशील होत आहे. असे जाणून बुद्धीमान लोक मज परमेश्वराला भक्तीभावानी युक्त होऊन ध्यानपूर्वक नेहमी मलाच भजत असतात ||8|| माझ्या ठिकाणी आपल्या मन आणि प्राण अर्पण करणारे माझे भक्तजन, एकमेकांमध्ये (परस्पर) माझे गुणतत्व सांगत आणि नाम, स्वरुपांचे इत्यादि चे कीर्तन करत माझ्यात निरंतर संतुष्ट व आनंदाचा अनुभव घेत असतात ||9|| त्या निरंतर प्रेमपूर्वक माझे ध्यानात ,कीर्तनात वगैरे मध्ये (भक्ती योगात) मग्न झालेल्या माझ्या भक्तांना मी बुद्धीयोग (ज्ञान) प्रदान करतो ज्यामुळे ते (मृत्यूनंतर) मलाच प्राप्त होतात ||10|| हे अर्जुना ! त्यांच्यावर कृपा करण्यासाठी त्यांच्या आत्म्यात (व बुद्धीत) स्थित असलेला मी स्वत: त्यांच्यात अज्ञानाने उत्पन्न झालेल्या (संसार दुखरूपी) अंध:काराला प्रकाशमय तत्वज्ञानरूपी दीपका द्वारा नाहीसा करतो ||11||

## अर्जुन म्हणाला

(हे केशव !) आपणच परम ब्रह्म (सर्वांचे श्रेष्ठ आत्मा) ,परम धाम आणि परम पवित्र आहात. कारण आपल्याला सर्व ऋषिगण सनातन, दिव्य पुरूष ||12|| तसेच आपल्याला देवांचेही आदिदेव आणि सर्वव्यापी असे म्हणतात. देवर्षी नारद, असित, देवल व महर्षी वेदव्यासही तसेच सांगतात आणि आपणही मला तेच सांगत आहे ||13|| हे केशव ! जे काही मला आपण सांगत आहात, ते सर्व मी सत्य मानतो, कारण हे भगवान ! आपले व्यक्तीत्व (लीला मय स्वरुपाला) ना दानव जाणू शकतात ना देव ||14|| हे भुतांना उत्पन्न करणारे ! हे भुतांचे ईश्वरा ! हे देवांचे देव ! हे जगाचे स्वामी ! हे पुरूषोत्तमा ! तुम्ही स्वत:च आपल्याला पूर्णपणे जाणत आहात ||15|| म्हणून आपण विभूतिच्या योगाने या सर्व जीवांना व्यापून राहले आहात आणि आपल्या त्या सर्व दिव्य (ऐश्वर्य)

विभूतींना संपूर्णपणे सांगायला आपणच समर्थ आहात ||16|| हे योगेश्वरा ! मी कशा प्रकारे निरंतर चिंतन करीत आपल्याला जाणावे ? आणि हे भगवान ! आपण कोण-कोणत्या भावात माझ्याकडून चिंतन करण्यास योग्य आहात ? ||17|| हे जनार्दना ! आपली योगशक्ती आणि विभूती (ऐश्वर्य) मला पुन्हा विस्ताराने सांगा. कारण आपली अमृतमय वचने ऐकता माझी तृप्ती होत नाही ||18|| भगवंताचे मुख्य विभूती ||

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

हे कुरूश्रेष्ठा ! आता मी ज्या माझ्या प्रमुख दिव्य विभूती (ऐश्वर्य) आहेत ,त्या मुख्य अशा तुला सांगतो. कारण माझ्या विस्ताराचा तर अंतच नाही ||19|| हे अर्जुना ! मी सर्व भूतांच्या ह्रदयात असणारा आत्मा म्हणजे परमात्मा आहे . तसेच सर्व भुतांचे आदि, मध्य आणि अंतही मीच आहे ||20|| आदितीच्या बारा पुत्रापैकी प्रमुख आदित्य विष्णु मी आहे आणि ज्योतीमध्ये किरणांणी युक्त सूर्य मी आहे ,मरूद्गणांमध्ये (एकोण पन्नास वायुदेवतांचे तेज) मरीची आणि नक्षत्रांचे अधिपती चंद्र मी आहे ||21|| वेदांमध्ये सामवेद मी आहे ,देवांमध्ये (स्वर्गलोकचा राजा) इन्द्र, इंद्रियांमध्ये मन आणि सर्व जीवांमध्ये चेतना (जीवन शक्ति) मी आहे ||22|| अकरा रूद्रांमध्ये शंकर मी आहे ,यक्ष-राक्षसांमध्ये धनाचा स्वामी कुबेर, आठ वसूतील अग्नी आणि शिखरे असणारे पर्वतातील सुमेरू पर्वत मी आहे ||23|| पुरोहितां मध्ये (देवतांचे गुरू) बृहस्पति मला समज, हे पार्थ ! सेनापति मधला स्कंद (रुद्रपुत्र कार्तिकेय) आणि सर्व जलाश्यांतील समुद्र मी आहे ||24|| मी महर्षीमध्ये (ब्रह्मापुत्र) भृगु आणि शब्दांमध्ये एक अक्षर (ॐ) अर्थात ओंकार मी आहे .सर्व प्रकारच्या यज्ञांमध्ये जपयज्ञ आणि स्थिर वस्तूंतील हिमालय पर्वत मी आहे ||25|| सर्व वृक्षांमध्ये पिपळ, देवर्षीमध्ये नारद मुनी ,गन्धर्वांमध्ये चित्ररथ आणि

सिद्धी मुनीमध्ये कपिल मुनी मी आहे ॥26॥ घोड्यांमध्ये अमृत-मंथना बरोबर उत्पन्न झालेला उच्चे:श्रवा नावाचा घोडा ,श्रेष्ठ हत्तीं मध्ये ऐरावत नावाचा हत्ती आणि मनुष्यांत नरपति मला समज ॥27॥ मी शस्त्रांमध्ये वज्र ,गाई मध्ये कामधेनू, सर्पांमध्ये वासुकी आणि संतान-उत्पत्तिचे कारण असणारे काम अर्थात मदन मी आहे ॥28॥ मी नागांमध्ये शेषनाग आणि जलचरांचा अधिपति वरूणदेव ,पितरांमध्ये अर्यमा नावाचा पितर आणि शासन करऱ्यांमध्ये यमराज मी आहे ॥29॥ मी दैत्यांमध्ये प्रल्हाद ,वशीकारांमध्ये काल, पशुमध्ये मृगराज सिंह आणि पक्ष्यांमध्ये गरूड मी आहे ॥30॥ मी पवित्र करणारा वायू ,शस्त्र धारण करण्यात श्रीराम ,माशांत मगर आणि नद्यांत श्रीभागीरथी गंगा मी आहे ॥31॥ हे अर्जुना ! सृष्टिचा आदि ,अंत तसेच मध्य सुद्धा मीच आहे ,विद्यातील आत्मविद्या (ज्ञान) आणि परस्पर तत्व निर्णयांमध्ये होणारा वाद मी आहे ॥32॥ मी अक्षरांतील “अ”-कार , संमासापैकी द्वंद्व समास, संहार करण्यातील महाकाल रूद्र आणि सृष्टिकर्तांमध्ये चतुर्मुख ब्रह्मा सुद्धा मीच आहे ॥33॥ मी सर्वांचा आहारी जाणारा “मृत्यू” आहे ,सहा भाव विकारातून पहिला विकार “जन्म” मी आहे तसेच स्त्रियांमध्ये कीर्ति, लक्ष्मी, वाणी ,स्मृति ,मेधा (लावण्य), धृती आणि क्षमा सुद्धा मीच आहे ॥34॥ मी साम वेदात बृहतÐसाम (इन्द्र स्तुतिरूप), छंदांमध्ये गायत्री छंद, महिन्यांतील मार्गशीर्ष आणि (चार) ऋतुंतील वसंत (ऋतु) मी आहे ॥35॥ मी कपटी खेळांमध्ये जुगार आहे ,तेजस्वी महापुरूषांचे तेज, विजयातील जय आहे उघमी (व्यवसायी) पुरूषांचे व्यवसाय व साहस आणि बलवान पुरूषांचे बल मी आहे ॥36॥ मी वृष्णि (यदु) कुळात वासुदेव ,पाडवांतील अर्जुन, मुनिंमध्ये वेदव्यास आणि कवींमध्ये (दैत्यांचे गुरू) शुक्राचार्य कवी सुद्धा मीच आहे ॥37॥ दमन करण्याची शक्तिमध्ये

दण्डशक्ति ,विजय इच्छा ठेवणारे यांची नीति, गुप्त ठेवणाराचं मौन (भाव) आणि (आत्मसाक्षातकारी, संत) ज्ञानीजनांमध्ये तत्त्वज्ञान मी आहे ||38|| तसेच हे अर्जुना ! संपूर्ण सृष्टि चे बीज (व कारण) मीच आहे. कोणताही चराचर प्राणी माझ्याविना अस्तित्वात राहूच शकत नाही ||39|| हे परंतपा ! माझ्या दिव्य विभुतीचा अंत नाही ,हा विस्तार तर तुझ्यासाठी संक्षेपामध्ये सांगीतला ||40|| जी जी (विभूति युक्त) ऐश्वर्य युक्त, कान्तियुक्त आणि शक्तियुक्त वस्तु आहेत ,ती ती समस्त वस्तु तू माझ्या तेजाच्या अंशाशी उत्पन्न समज ||41|| किंवा हे अर्जुना ! हे फार फार जाणण्याचे तुला काय प्रयोजन आहे ? मी या संपूर्ण जगाला केवल एका अंशाने सर्व व्यापून व धारण करून राहिलो आहे ||42||

*************************************************************

# विश्वरूपदर्शन योग

---

## अर्जुन म्हणाला

माझ्यावर कृपा करण्यासाठी आपण जी अत्यंत गुप्त अध्यात्म विषयी जे उपदेश मला केला, त्यांने माझा मोह (अज्ञान) नाहीसे झाले आहे ||1|| कारण हे कमलदलनयना ! मी आपल्याकडून जीवांची उत्पत्ति आणि प्रलय विस्तारपूर्वक ऐकले आहे ,तसेच आपले अविनाशी माहात्मय (प्रभाव) ही ऐकला आहे ||2|| हे परमेश्वरा ! आपण आपल्या विषयी जसे सांगत आहात, ते बरोबर आहे ,तरी पण हे पुरूषोत्तमा ! मला आपले ऐश्वर्ययुक्त स्वरुपाला प्रत्यक्षात पाहण्याची इच्छा आहे ||3|| हे प्रभो ! जर मला आपले रूप पाहणे अशक्य आहे, असे आपल्याला वाटत असेल , तर हे योगेश्वरा ! त्या अविनाशी (विराट) स्वरुपाचे दर्शन मला घडवा ||4||

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

हे पार्थ ! आता तू माझे शेकडो Đहजार नाना प्रकारची, नाना रंगाची आणि नाना आकारांची अलौकिक रुपांना पहा ||5|| हे भरतवंशी अर्जुना ! माझ्यामध्ये अदितीच्या बारा पुत्रांना, आठ वसूला, अकरा रूद्रांना, दोन्ही अश्विनी कुमार, एकोण पन्नास मरूद्गण (वासुदेवांना) आणि पुष्कळ अशी यापूर्वी न पाहलेली आश्चर्यकारक रुपांना पहा ||6|| हे अर्जुना ! आता या माझ्या शरीरात एकत्रित असलेले चराचराह संपूर्ण जग पहा. तसेच इतरही जे काही तुला पाहण्याची इच्छा असेल, ते पण पहा ||7|| परंतु तू मला तुझ्या या चर्मचक्षुनी खात्रीने पाहू शकणार नाही, म्हणून मी तुला दिव्य दृष्टी देतो तिच्या साह्याने तू माझ्या ईश्वरी योग ऐश्वर्य (शक्ति) पाहा ||8||

## संजय म्हणाला

हे महाराज! महायोगेश्वर , सर्व पापाचा नाश करणारे भगवंतानी असे सांगून मग अर्जनाला आपले परम (दिव्य) ऐश्वर्ययुक्त विश्वरूप दाखविले ||9|| अनेक तोंडे व डोळे असलेल्या, अनेक आश्चर्यकारक दर्शने ,असंख्य (गदा, चक्र, धनुष इत्यादि) अशा दिव्य शस्त्रे हातात घेतालेल्या ||10|| दिव्य माळा आणि वस्त्रे धारण केलेल्या ,तसेच दिव्य गंधाने विभुषित, कांतियुक्त, सर्व आश्चर्यांनी परीपूर्ण आणि सर्व बाजूंनी तोंडे असलेल्या विभिन्न रूपांना त्या अर्जुनाने सर्वत्र (व्याप्त) पाहिले ||11|| आकाशात हजार सूर्य एकदम उगवले असता जो प्रकाश पडेल, तो सुद्धा त्या विश्वस्वरूप परमेश्वरच्या प्रकाशा ईतका कदाचित सारखे होणार नाही ||12|| पाण्डुपुत्र अर्जुनाने त्यावेळी अनेक प्रकारने विभागलेले संपूर्ण जग देवाधिदेव भगवान श्रीकृष्णांच्या त्या (विराट) शरीरात एकत्रित असलेले विश्वाला (भ्रमांड) पाहिले ||13|| त्यानंतर तो आश्चर्यचकित झालेला व अंगावर रोमांच उभे राहिलेले अर्जुनाने ,ते प्रकाशमय (आकाशात सर्वत्र व्याप्त) विराट (विश्व) स्वरूप भगवंताला श्रद्धा भक्तीसह मस्तकाने प्रणाम करून हात जोडून असे वचन म्हणाला ||14||

## अर्जुन म्हणाला

हे देवा ! मी आपल्या दिव्य देहामध्ये संपूर्ण देवांना आणि तसेच अनेक भूतांच्या समुदायांना ,कमळाच्या आसनावर विरजमान झालेल्या त्या चतुर्मुख ब्रह्मदेवाला ,(रूद्र) शंकाराला ,सर्व ऋषिंना तसेच दिव्य सर्पांनाही पाहत आहे ||15|| हे संपूर्ण विश्वाचे स्वामी ! मी आपल्या अनेक बाहू पोट, तोंडे आणि डोळे असलेले अनन्त रूपांना सर्वत्र पाहत आहे .तसेच हे विश्वरूपा ! मला आपले न अंत ,न मध्य ,न आरंभ दिसत आहे ||16|| मी आपल्याला मुकुट घातलेले, गदा व चक्र धारण केलेले, सर्व बाजूंनी प्रकाशमय तेजयुक्त असे, प्रज्वलित अग्नी व सूर्याप्रमाणे

तेजयुक्त ,पाहण्यास अतिशय कठिण आणि दृष्टी अमर्यादीत असे आपल्याला सर्वत्र पाहत आहे ||17|| आपणच जाणण्याजागे परब्रह्म परमात्मा आहात ,आपणच या जगाचे आधार आहात, आपणच अनादि धर्माचे रक्षक आहात आणि आपणच अविनाशी सनातन परम पुरूष आहात ,असे मला वाटत आहे ||18|| आदि, मध्य आणि अंत नसलेले ,अनन्त सामर्थ्ययुक्त, अनन्त भुजायुक्त, चन्द्र व सूर्यासारखे नेत्रयुक्त ,पेटलेल्या अग्नीसारखे आपले मुख आहे आणि आपल्या तेजाने या जगाला तापविणारे, असे मी आपल्याला सर्वत्र पाहत आहे ||19|| हे महात्मना ! हे स्वर्ग, पृथ्वी यांच्यामधील आकाश आणि सर्व दिशा फक्त आपण एकट्यानेच व्यापून टाकले आहेत. आपले हे अलौकिक आणि भयंकर रूप पाहून तिन्ही लोक अत्यंत भयभीत झाले आहेत ||20|| तसेच सर्व देवगण आपल्यात शिरत आहेत आणि काही भयभीत होऊन हात जोडून आपल्या नावांचे व गुणांचे वर्णन करीत आहेत. तसेच महर्षि व सिध्दगण ("सर्वांचे कल्याण होवो" अशी मंगल आशा करून) मनोरम स्त्रोत्रे म्हणून आपली स्तुती करीत आहेत ||21|| अकरा रूद्र, बारा आदित्य तसेच आठ वसु ,साध्यदेवगण, विश्वदेवगण, दोन्ही अश्विनी कुमार, मरूद्गण आणि पितृगण, तसेच गंधर्व ,यक्ष , राक्षस आणि सिद्धगण आहेत. ते सर्व ऐकत्र होऊन आपल्याकडे आश्चर्यनी पाहत आहेत ||22|| हे महाबाहो ! आपले अनेक नेत्र, असंख्य विशाल डोळे, हात ,पाय असलेले अनेक पोटे आणि अनेक दाढ्यांमुळे अतिशय भयंकर असे महान विराट रूप पाहून सर्वजन व्यथित झाले आहेत. तसेच मी सुद्धा व्यथित झालो आहे ||23|| हे विष्णु ! संपूर्ण आकाशाला व्यापणारे, तेजोमय, अनेक रंगानीयुक्त, सर्वत्र पसरलेली तोंडे व तेजस्वी विशाळ डोळे असे आपले रूप पाहून भयभीत अंत:करण झालेल्या आता माझे धैर्य व शान्ती

सुद्धा नाहीशी झाली आहे ||24|| दाढ्यांमुळे भयंकर व प्रलयकाळ अग्नीसारखे प्रज्वलित आपले तोंडे पाहून मला दिशा कळेनाशा ,आता माला सुखहिं मिळत नाही. म्हणुन हे देवाधिदेवा ! हे जगन्निवासा ! आपण कृपया प्रसन्न व्हा ||25|| ते घृतराष्ट्राचे सर्व पुत्र ,राजा समुदायसह आपल्यात प्रवेश करत आहेत आणि पितामह भीष्म, द्रोणाचार्य, तसेच तो कर्ण आणि आमच्या बाजूच्याही प्रमुख योधांसह ||26|| सगळेच आपल्या दाढर्यांमुळे भयंकर दिसणारे तोंडात मोठ्या वेगाने धावत धावत घुसत आहेत आणि कित्येक डोकी चिरडलेली आपल्या दातांच्या फटीत अडकलेली दिसत आहेत ||27|| ज्याप्रमाणे नद्याचे जल प्रवाह अति वेगाने समुद्राच्या दिशेने धाव घेतात अर्थात समुद्रात प्रवेश करतात त्याच प्रमाणे ते सर्व नरवीर आपल्या पेटलेल्या तोंडात शिरत आहेत ||28|| जसे पतंग मोहाने मरून जाण्यासाठी पेटलेल्या अग्नीत अतिशय वेगाने धावत शिरतात ,तसेच हे सर्वलोक सुद्धा स्वत:च्या नाशासाठी आपल्या प्रज्वलित तोंडात अतिशय वेगाने धावत प्रवेश करत आहेत ||29|| आपण त्या सर्व लोकांना प्रज्वलित तोंडानी गिळून सर्व बाजूंनी वारंवार चाटत आहात .हे विष्णु ! आपल्या प्रखर प्रकाशयुक्त तेज सर्वत्र व्याप्त संपूर्ण जगाला तापवित आहे ||30|| हे देवश्रेष्ठा ! आपणाला नमस्कार असो, आपण प्रसन्न व्हा. कृपया करून मला सांगा हे उग्रधारी रूप धारण करणारे आपण कोण आहात ? आदिपुरूष अशा आपल्याला मी विशेष रीतीने जाणू इच्छितो .कारण आपली अशी करणी मला कळत नाही ||31||

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

(हे अर्जुना !) मी संपूर्ण जगाचा नाश करणारा महाकाल आहे. या ठिकाणी लोकांच्या नाशासाठी मी प्रवृत्त झालो आहे. म्हणून शत्रू पक्षात सैन्यात जे योद्धा आहेत, ते सर्व तुझ्याद्वारा मारले गेले नाही, तरी ते जिवंत राहणार नाही ||32|| म्हणूनच तू उठ, यश मिळवं ,शत्रूंना जिंकून धन-धान्य

आणि संपन्न राज्याचा उपभोग घे, ते सर्व शूरवीर आधीच माझ्याकडून मारले गेले आहेत. हे सरव्याची ! तू फक्त निमित्तमात्र हो ||33|| द्रोणाचार्य, भीष्म तसेच जयद्रथ आणि कर्ण त्याच प्रमाणे माझ्याकडून ते पूर्वीच मारले गेले आहेत आणि इतरही पुष्कळ शूर योधांना तू मार, भिऊ नकोस युद्धात खात्रीने शत्रूंना जिंकशील म्हणून तू युद्ध कर ||34||

## संजय म्हणाला

भगवान केशवांचे हे बोलणे ऐकून किरीटी अर्जुनाने थरथरत हात जोडून नमस्कार केला आणि अत्यंत भयभीत होऊन प्रणाम करून भगवान श्रीकृष्णला सदगदित होऊन असे वचन म्हणाला ||35||

## अर्जुन म्हणाला

हे अन्तर्यामी ! आपले नाव, गुण आणि प्रभावयांच्या वर्णनाने जग अतिशय आनंदित होत आहे व तुमचे अतिशय प्रेम प्राप्त करत आहेत, राक्षसगण सुद्धा घाबरून दशदिशांत पळून जात आहेत तसेच सर्व सिध्दिगणांचे समुदाय आपल्याला नमस्कार करीत आहे , हे योग्यच होय ||36|| हे महात्मन् ! चतुर्मुख ब्रह्मापेक्षा श्रेष्ठ असे आदि सृष्टिकर्ता आपल्याला हे सर्व नमस्कार का बरे करणार नाही ? कारण हे अनंता ! हे देवाधिदेवा ! हे जगन्निवासा ! आपणच सत् (कारण) असत् (कार्य) त्यांचेही प्राचीन अक्षर (अविनाशी) तत्व परम ब्रह्म (सर्वांचे आत्मा) आहात ||37|| आपण आदिदेव, सनातन (प्राचीनतम) पुरूष ,परम आश्रय स्थळ, ज्ञाता, ज्ञेय (जाणणे योग्य) आणि (सर्वश्रेष्ठ) दिव्य परम धाम आहात. हे अनन्तरूपा ! आपणच हे संपूर्ण विश्व व्यापले आहे ||38|| आपण वायू, ,यमराज, अग्नी, वरूण, चन्द्र, प्रजेचे स्वामी ब्रह्मदेव आणि ब्रह्मदेवाचेही प्रपितामह (जनक) आहात. आपल्याला हजार वेळा नमस्कार. नमस्कार असो ! आपणाला आणखीही वारंवार नमस्कार ! नमस्कार असोत ||39|| हे सर्वस्वरूपा ! आपल्याला पुढून, मागून, सर्व

बाजूनी नमस्कार असो. कारण अनन्त पराक्रमशाली अशा आपण सर्व जग व्यापले आहे. म्हणुन आपण (विराट) सर्वस्वरूप आहात ||40|| आपले प्रभाव न जाणल्यामुळे ,आपण माझे मित्र आहात असे मानून प्रेमाने किंवा चुकीने मी “कृष्णा ! हे यादव ! हे सख्या ! असे जे काही विचार न करता मुद्दाम म्हटले असेल ||41|| आणि हे अच्युता ! माझ्याकडून विनोदासाठी फिरताना ,झोपताना, बसल्या वेळी आणि भोजनाचे वेळी, एकांतात किंवा मित्रांच्या समक्ष जो अपमान झाला असेल. त्या सर्वांन साठी मी क्षमा मागतो ||42|| हे अतुलनीयप्रभावा ! आपणच या चर (माणूस, पशु, कीटक) अचर (वृक्ष, डोंगर) ,जगाचे वडील, पूज्य, गुरू (ब्रह्मदेवाचेही गुरू) आणि श्रेष्ठ गुरू आहात. त्रैलोक्यात आपल्या सारखे दुसरे कोणीही नाही, मग मी आपल्याहून श्रेष्ठ कसा असू शकतो ? ||43|| म्हणूनच हे प्रभू ! मी आपल्या चरणी दंडवत प्रणाम करून स्तुत्य अशा आपण ईश्वराने प्रसन्न व्हावे. म्हणून प्रार्थना करीत आहे. हे देवा ! जसे वडील पुत्राचे, मित्र मित्राचे आणि पती पत्नीचे अपराध क्षमा करतो, तसेच आपणही मला क्षमा करण्यास समर्थ आहात ||44|| पूर्वी न पाहीलेले आपले आश्चर्यकारक रुपांना पाहून मी अत्यंत आनंदी होत आहे आणि माझे मन भीतीने व्याकुलही झाले आहे. म्हणून आपण मला ते चतुर्भुज विष्णुरूप तसेच पुन: दाखवा. हे देवेशा ! हे जगन्निवासा ! प्रसन्न व्हा ||45|| मी पहिल्यासारखेच आपल्याला मुकुट धारण केलेले तसेच गदा आणि चक्र हातात घेतलेले पाहू इच्छितो. म्हणून हे विश्वस्वरूपा ! हे सहस्रबाहो ! आपण त्याच सौम्य (शांत) चतुर्भुज रूपाने प्रकट व्हा ||46||

## श्री(श्रेष्ठ)भगवान म्हणाले

हे अर्जुना ! मी तुझ्यावर अनुग्रह करण्यासाठी योगशक्तिच्या प्रभावाने हे माझे परम तेजोमय, सर्वांचे आदि, असीम विराट असे रूपे तुला

दाखवले .त्याप्रकारचे विश्वस्वरूप तुझ्याशिवाय दुसरे कोणीही यापूर्वी पाहीले नव्हते ||47|| हे अर्जुना ! तुझा शिवाय दूसरे वेद अध्ययन, यज्ञ, दान, क्रिया आणि उग्र तपश्चर्यांनी या मनुष्य लोकात माझ्या अशा प्रकारच्या विश्वस्वरूपधारी चे दर्शन करणे शक्य नाही ||48|| माझे या प्रकारचे हे भयंकर रूपे पाहून तू भयभीत व भ्रमित होऊ नकोस, तू सर्व भयापासून मुक्त होऊन प्रीतियुक्त व प्रसन्न चित अंत:करणाने माझे हे शंख-चक्र-गदा-पद्म धारण केलेले चतुर्भुज रूप पुन्हा पहा ||49||

## संजय म्हणाला

भगवान वासुदेवानी अर्जुनाला असे सांगून पुन्हा तसेच आपले चतुर्भुज रूप दाखवले आणि पुन्हा माहात्म्य श्रीकृष्णानी आपले सौम्य रूप धारण करून भयभीत अर्जुनला धीर दिला ||50||

## अर्जुन म्हणाला

हे जनार्दना ! आपले हे अतिशय सुंदर मनुष्य रूप पाहून आता माझे मन शांत झाले आहे आणि मी पुन: माझ्या मूळ स्वभावाला प्राप्त झालो आहे ||51||

## श्रीभगवान म्हणाले

माझे जे तू चतुर्भुज रूप पाहीलेस ते पाहाव्यास मिळणे अतिशय दुर्लभ आहे देवगण नेहमी असे दिव्य ,मधुर रूपाचे नित्य दर्शनाची इच्छा करीत असतात ||52|| तू जसे मला पाहीलेस, असे माझे चतुर्भुज रुपांचे दर्शन वेदाने ,तपाने ,दानाने आणि यज्ञाने सुद्धा मला पाहणे ह्या जगात शक्य नाही ||53|| परंतु हे परंतप अर्जुना ! अनन्य (इच्छा रहित) भक्तीनेच या प्रकारच्या असे चतुर्भुज धारी रुपात मला प्रत्यक्ष पाहणे, तत्वत: जाणणे तसेच त्यात प्रवेश करणे अर्थात माझ्यात एकरूप होणे शक्य आहे ||54|| हे पांडव (अर्जुना) ! जे व्यक्ती फक्त माझ्यासाठी सर्व कर्तव्य कर्म करणारे, मलाच परम श्रेष्ठ आश्रय मानणारे ,आसक्तिरहित होऊन सर्व प्राणीमात्रा

**विषयी वैरभाव (राग-द्वेष) न ठेवणारे ,ते अनन्य भक्त शेवटी मलाच प्राप्त होतात ||55||**

*************************************************************************************

# अध्याय १२
# भक्तीयोग

---

## अर्जुन म्हणाला

जे अनन्य प्रेमी भक्तजन पूर्वी सांगितल्या प्रमाणे निरंतर भजन ध्यानात मग्न राहून माझे सगुणरूप परमेश्वराची आणि दुसरे जे केवल निराकार अक्षर (ॐ) ब्रह्माची उपासना (ध्यान) करतात ,त्या दोन्ही मध्ये उत्तम योगी कोण आहे? ॥1॥

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

जे आपले मन माझ्यावर एकाग्र करून निरंतर माझीच भक्ती करीत असतात, तेच श्रद्धालु दिव्य योगात युक्त असलेले भक्त माझ्या मते सर्वश्रेष्ठ योगी आहेत ॥2॥ परंतु जे पुरूष सर्व इंद्रियांना चांगल्या प्रकारे ताब्यात ठेवून सर्वत्र समबुध्दियुक्त होऊन सर्वव्यापी ,अवर्णिय सर्वस्वरूप आणि नेहमी एकरूप असणारा नित्य ॥3॥ अचल, निराकार, अविनाशी ,सच्चिदानंद ब्रह्माची निरंतर एकमात्र माझेच (ॐ ब्रह्म एकअक्षराचे) ध्यान करीत उपासना करतात ,तेच सर्व प्राणीमात्राचे हितार्थ कर्म करणारे योगी (शेवटी) मलाच प्राप्त करतात ॥4॥ पण निर्विशेष निराकार ब्रह्मात (हे परमेश्वर) चित्त गुंतलेल्या त्या योग्यांचे (ॐ ध्यानयोग) साधनेत कष्ट जास्त आहेत. कारण देहाच्या अभिमानी व्यक्ती द्वारा अव्यक्त (सूक्ष्म) ब्रह्माची प्राप्ती दुष्कर असते ॥5॥ परंतु जे मत् परायण भक्तजन सर्व कर्मे माझ्या ठिकाणी अर्पेन करून माझे सगुणरूप परमेश्वराचीच अनन्य भक्तीयोगाच्याद्वारा प्रतिदिन निरंतर चिंतन करीत माझी उपासना करतात ॥6॥ हे अर्जुना ! त्या माझ्यात चित्त गुंतवलेल्या भक्तांचा मी तत्काल मृत्यू (दुख) रुपी संसार सागरातून उद्धार करणारा होतो ॥7॥ माझ्यातच मन ठेव ,माझ्या ठिकाणीच बुद्धीची स्थापना कर. म्हणजे तू मग माझ्याच

जवळ राहशील ,यात मुळीच संशय नाही ||8|| जर तू माझ्यात मन निश्चल करण्यास समर्थ नसशील ,तर हे अर्जुना ! योग-अभ्यास द्वारा मला प्राप्त होण्याची इच्छा कर ||9|| जर तू वर सांगितलेल्या अभ्यासालाही असमर्थ असशील .तर केवल माझ्यासाठी कर्म कर ,मत् परायण हो. अशा रीतीने माझ्यासाठी कर्मे केल्यानेही (परम) सिद्धी तू प्राप्त करशील ||10|| जर तू वर सांगितलेले साधन करण्यास असमर्थ अशील, तर सर्व कर्मे मला समर्पित करून कर्मसंन्यास योगाचा आश्रय घेत आणि मनाला नियंत्रण करून सर्व कर्मफलांचा त्याग कर ||11|| कारण अभ्यासापेक्षा श्रेष्ठ आहे ज्ञान आणि ज्ञानापेक्षा श्रेष्ठ मज परमात्मा स्वरूप ध्यान श्रेष्ठ आहे, कारण ध्याना केल्याणे सर्व कर्म फलांचा त्याग होतो आणि त्यागाने ताबडतोब परम शान्ति मिळते (परमात्म्यात मन स्थिर होते ) ||12|| जे भक्त सर्व प्राण्यांच्या प्रति द्वेषरहित, मित्र भावपण, कृपाळू, पुत्र-स्त्री, कुळ इत्यादि मध्ये ममता शून्य, देह, संपत्ति आदिमध्ये अंहकार शून्य ,सुख-दु:खात समभाव असलेला, क्षमा करणारा ||13|| सर्वदा प्रसन्न चित्त ,माझ्यात भक्तीयोगामध्ये युक्त, सर्व इंद्रिये ताब्यात ठेवणारा, दृढनिश्चयी, मन आणि बुद्धीला माझ्या (नाम-गुण-किर्तन) मध्ये समर्पित करणारे भक्त मला प्रिय आहेत ||14|| जे भक्त कोणत्याही प्राणीमात्राला त्रास देत नाही आणि कोणालाही त्याच्यापासून त्रास होत नाही .जे हर्ष, मत्सर, भीती आणि (सांसारिक उथलपुथल) उद्वेग इत्यादि पासून अलिप्त राहतात ,तेच भक्त मला प्रिय आहे ||15|| ज्या भक्ताला व्यवहारी कार्यांपासून कुठलीच अपेक्षा नसते ,ज्यांचा अंतर्बाह्य शुध्द, आहे, अनासक्त, उद्वेगरहित आणि भक्ती प्रतिकूल असणारे सर्व कार्यांमध्ये तटस्थ राहणारे माझे भक्त मला प्रिय आहेत ||16|| जे कधीही प्रिय वस्तु प्राप्त झाली की हर्षित होत नाही व नाही मिळाली असता द्वेष करत नाही ,नष्ट झाली असता शोक करत नाही

व अप्राप्य वस्तुची इच्छा सुद्धा करीत नाहीत, शुभ-अशुभ कर्मांचा त्याग करणारे, तेच भक्त मला प्रिय आहेत ||17|| जे शत्रू-मित्र ,मान-अपमान या विषयी समभाव बाळगतो तसेच शीत-उष्ण, सुख-दुःख इत्यादि द्वंद्वात ज्याची वृत्ती सारखीच राहते आणि ज्याची वाणी संयत आहे ||18|| ज्याला निंदा-स्तुती एकसारखे वाटते ,जे मिळेल त्यामध्येच तो संतुष्ट राहतो (शरीर निर्वाह करतो), ज्याला निवास स्थानात (घर-कुटुंबात) आसक्ति (ममता) नसते, ते स्थिर बुद्धी असणारे भक्तीयुक्त भक्त मला प्रिय आहेत ||19|| परंतु जे श्रद्धाळू भक्त मला सर्वस्व मानून वर सांगितलेल्या धर्ममय अमृताची (भगवद् गीताचे) नित्य उपासना (पाठ व उपदेशांचे पालन) करतात, ते भक्त मला अतिशय प्रिय आहेत ||20||

********************************************************************************

" निरंतर "ॐ नमो भगवते वासुवाय" मंत्र लिहूण काढणे व जप करने, "हरे कृष्ण " महामंत्रांचा कीर्तन , श्रवण वगरे जपयज्ञ करणें, श्रीमद्भगवद्गीत, रामायणाचा, पुराणांचे नित्य वाचन , ज्ञानयज्ञ करणे "

कृष्णाचे मधुर कीर्तन , ग्रंथ डावूनलोड करा

www.srikrsnaknowledge.wordpress.com

# क्षेत्रक्षत्रज्ञविभागयोग

---

## अर्जुन म्हणाला

हे केशव ! मला प्रकृती ,पुरूष (जीव) ,क्षेत्र (शरीर) ,क्षेत्रज्ञ ,ज्ञान आणि ज्ञेय (उत्तम असे जाणणे योग्य) निश्चितपणे या सर्वांना जाणून घ्यावयाची इच्छा आहे ||1|| क्षेत्र व क्षेत्रज्ञ ||

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

हे कौंतेया (अर्थात कुंतीपुत्र अर्जुना), हे शरीराला क्षेत्र या नावाने संबोधिले जातो आणि याला जो जाणतो त्याला व त्याचे तत्त्व जाणणारे ज्ञानी लोकांना, क्षेत्रज्ञ असे म्हणतात ||2|| हे भारता (अर्थात भरतवंशी अर्जुना), तू सर्व क्षेत्रांमध्ये क्षेत्रज्ञ (संपूर्ण शरीराला जाणणारा) मलाच समज आणि क्षेत्र (शरीर) व क्षेत्रज्ञ (परमेश्वरा) बदल जे ज्ञान आहे तेच (सर्वश्रेष्ठ) ज्ञान आहे, असे माझे मत आहे ||3|| ते क्षेत्र जे आणि जसे आहे, तसेच ज्या विकारांनी युक्त आहे आणि ज्या कारणांपासून जे झाले आहे, तसेच तो क्षेत्रज्ञही जो आणि ज्या प्रभावाने युक्त आहे, ते सर्व थोडक्यात माझ्याकडून ऐक ||4|| हे क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचे तत्त्वज्ञान ऋषींनी पुष्कळ प्रकारें सांगितले आहे आणि निरनिराळ्या वेदमंत्रांनी निश्चित केलेले आहेत. तसेच पूर्णपणे युक्तियुक्त कारण-परिणामाद्वारा ब्रह्मसूत्रांच्या पदांनीही निश्चित केलेले आहेत ||5|| पाच महाभूते, अहंकार, बुद्धी आणि मूळ प्रकृती तसेच दहा इंद्रिया, एक मन आणि पाच इंद्रियांचे विषय अर्थात शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ||6|| तसेच इच्छा, द्वेष, सुख, दुःख, स्थूल देहाचा समूह, चेतना आणि धृती अशा प्रकारे विकारांसहित हे क्षेत्र (शरीर) थोडक्यात सांगितले गेले आहेत ||7|| मोठेपणाचा अभिमान नसणे, ढोंग न करणे, कोणत्याही सजीवाला कोणत्याही प्रकारे त्रास न

देणे, क्षमा करणे, मन, वाणी इत्यादींबाबत सरळपणा, श्रद्धा व भक्तीसह गुरूची सेवा, अंतर्बाह्य शुद्धी, अंतःकरणाची स्थिरता आणि मन व इंद्रियांसह शरीराचा निग्रह ||8|| इह व पर लोकांतील सर्व विषयांच्या उपभोगाविषयी आसक्ती नसणे आणि अहंकारही नसणे, जन्म, मृत्यू, वृद्धत्व आणि रोग इत्यादींमध्ये दुःख व दोषांचा वारंवार विचार न करणें ||9|| पुत्र, स्त्री, घर आणि धन इत्यादींची आसक्ती नसणे व ममता नसणे तसेच आवडती आणि नावडती गोष्ट घडली असता नेहमीच चित्त समतोल ठेवणे ||10|| मज परमेश्वरामध्ये अनन्य योगाने अव्यभिचारिणी भक्ती, तसेच एकान्तात शुद्ध ठिकाणी राहण्याचा स्वभाव आणि विषयासक्त मनुष्यांच्या सहवासाची आवड नसणे ||11|| अध्यात्मज्ञानात नित्य स्थिती आणि तत्त्वज्ञानाचा अर्थ जो परमात्मा आहे त्यालाच पाहणे, हे सर्व ज्ञान होय, आणि याउलट जे असेल, ते अज्ञान होय, असे म्हटले आहे. ||12|| जे जाणण्याजोगे आहे आणि जे जाणल्यामुळे मनुष्याला परम आनंद मिळतो, ते चांगल्या प्रकारे सांगतो. कारण त्या अनादी परमब्रह्मला सत् आणि असत् ही म्हणता येत नाही (फक्य "आहेत" असे म्हणतात) ||13|| तो परमात्मा सर्व बाजूंनी हात-पाय असलेले, सर्व बाजूंनी डोळे, डोकी व तोंडे असलेले, तसेच सर्व बाजूंनी कान असलेले आहे. कारण तो विश्वात सर्व काही सर्वत्र व्यापून राहिला आहे ||14|| तो सर्व इंद्रियांच्या विषयांना जाणणारे आहे. परंतु वास्तविकपणे तो सर्व इंद्रियांनीरहित आणि आसक्तिरहित असूनही तो सर्वांचे धारण-पोषण करणारा आणि निर्गुण असूनही गुणांचा भोग घेणारे (स्वामीही तोच) आहे. ||15|| तो चराचर सर्व प्राणिमात्रांच्या बाहेर व आत (ब्रह्मतत्वानी) परिपूर्ण भरले आहे. तसेच चर आणि अचरही तोच आहे आणि तो सूक्ष्म असल्यामुळे त्याला तू सहजपणे जाणू शकत नाही. तसेच तो अतिशय जवळ आणि दूरही आहे.

||16|| तो परमात्मा विभागरहित एकरूप असा आकाशासारखा परिपूर्ण असूनही चराचर संपूर्ण भूतांमध्ये वेगवेगळा असल्यासारखा भासत आहे. तसेच तो जाणण्यायोग्य परमात्मा सर्व भूतांचे धारणपोषण करणारा, तसेच संहारकर्ता आणि सर्वांना उत्पन्न करणारा ही तोच आहे ||17|| तो परब्रह्म सर्व तेजस्वी वस्तुतील प्रकाशाचा उगम स्थान आहे आणि अंधकाररूपी मायेच्या अत्यंत पलीकडे आहे असे म्हटले जाते. तो परमात्मा ज्ञानस्वरूप, जाणण्यास योग्य आणि तत्त्वज्ञानाने प्राप्त होण्याजोगा आहे. तसेच सर्वांच्या हृदयात विशेषरूपाने (निराकार रूपाने) राहिलेला आहे ||18|| अशाप्रकारे क्षेत्र तसेच ज्ञान आणि जाणण्याजोगे परमात्म्याचे स्वरूप थोडक्यात सांगितले आहेत. माझे भक्त हे तत्त्वतः जाणून घेतल्यावर माझ्या नित्य स्वभावाला प्राप्त होतात ||19|| प्रकृती आणि पुरुष (जीव) हे दोन्हीही अनादी आहेत, असे तू समज आणि राग-द्वेषादी विकार तसेच त्रिगुणात्मक सर्व पदार्थही प्रकृतीपासूनच उत्पन्न झालेले आहेत, असे समज ||20|| कार्य (कर्म) व कारण यांच्या उत्पत्तीचे मूळ कारण भौतिक प्रकृती असल्याचे म्हटले जाते आणि जीवात्मा हाच सुखदुःख भोगण्याला कारणीभूत आहे असे म्हटले जाते ||21|| प्रकृतीमध्ये राहिलेला पुरुष (जीव) प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या त्रिगुणात्मक पदार्थांचे उपभोग घेतो आणि त्या गुणांची संगतीच या जीवात्म्याला बऱ्या-वाईट योनींत (पशु,पक्षी, किट, देव, दानव, मनुष्य इत्यादि योनित) जन्म घेण्यास कारण आहे ||22|| दुसरा जो या देहात साक्षी असल्यामुळे उपद्रष्टा आणि खरी संमती देणारा असल्याने अनुमंता, सर्वांचे धारण-पोषण करणारा म्हणून भर्ता, जीवरूपाने भोक्ता, ब्रह्मदेव इत्यादींचाही स्वामी असल्याने महेश्वर (परमेश्वर) आणि शुद्ध सच्चिदानंदविग्रह असल्यामुळे त्याला परमात्मा असेही म्हणतात ||23|| अशा रीतीने पुरुषाला आणि गुणांसहित

प्रकृतीला जो मनुष्य तत्त्वतः जाणतो, तो सर्व प्रकारचे कर्म करीत असला जरी तो पुन्हा जन्म घेत नाही ||24|| त्या परमात्म्याला काहीजण शुद्ध झालेल्या सूक्ष्म बुद्धीने ध्यानाच्या योगाने हृदयात पाहातात (अनुभवतात). दुसरे काहीजण ज्ञानयोगाच्या द्वारा आणि इतर कितीतरी लोक निष्काम कर्मयोगाच्या (यज्ञक्रिया) द्वारा जाणून म्हणजेच प्राप्त करून घेतात ||25|| परंतु यांखेरीज इतर अर्थात मंदबुद्धी पुरुष आहेत, ते अशाप्रकारे न जाणणारे असतात. ते दुसऱ्यांकडून म्हणजेच तत्त्वज्ञानी पुरुषांकडून (हरे कृष्ण) श्रवण-कीर्तनाद्वारा माझी उपासना करतात ते पण श्रवण निष्ठ होऊन मृत्युरूप संसारसागर खात्रीने तरून जातात ||26|| हे भरतर्षभा (अर्थात भरतवंशीयांमध्ये श्रेष्ठ अर्जुना), जेवढे म्हणून स्थावर-जंगम प्राणी उत्पन्न होतात, ते सर्व क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगानेच उत्पन्न होतात, असे तू जाण ||27|| जे परमेश्वरला सर्वत्र समभावाने स्थित असलेला पाहतात, व जे योगी नश्वर  देहात त्या परमेश्वरला अविनाशी पाहतात तेच खरे अर्थाने पाहत असतात ||28|| कारण जे योगी सर्वांमध्ये समरूपाने स्थित असलेल्या परमेश्वराला समदृष्टिने पाहतात ते स्वतःचे नाश करून घेत नाही आणि तर तेच नंतर परम गतीची प्राप्ती करतात ||29|| आणि जे सर्व कर्मे सर्व प्रकारे प्रकृतीकडून केली जाणारी आहेत, असे पाहतात आणि आत्मा अकर्ता आहे, असे पाहतात, तेच खरे पाहणारे असतात ||30|| ज्या क्षणी हा पुरुष भूतांचे निरनिराळे भाव एका स्थानी परमात्म्यात असलेले आणि त्या परमात्म्यापासूनच सर्व भूतांचा विस्तार (व प्रकटीकरण) झाले आहे, असे निश्चितपणे पाहतो, त्याच क्षणी त्याला सच्चिदानंदघन ब्रह्माची प्राप्ती होते ||31|| हे कौंतेया (अर्थात कुंतीपुत्र अर्जुना), हा अविनाशी आत्मा अनादी आणि निर्गुण असल्यामुळे शरीरात राहात असूनही वास्तविक तो काही करीत नाही आणि कोणतेही कर्मांनी सुद्धा लिप्त होत नाही ||32||

ज्याप्रमाणे सर्वत्र व्यापलेले आकाश सूक्ष्म असल्याकारणाने कोणत्याही वस्तुने लिप्त होत नाही (वेगळा राहतो) त्याचप्रमाणे देहात सर्वत्र व्यापून असलेला आत्मा निर्गुण असल्याकारणाने देहाच्या गुणांनी सुद्धा लिप्त होत नाही ||33|| हे भारता (अर्थात भरतवंशी अर्जुना), ज्याप्रमाणे एकच सूर्य या संपूर्ण ब्रह्मांडाला प्रकाशित करतो, त्याचप्रमाणे एकच आत्मा संपूर्ण क्षेत्राला प्रकाशित करतो (जसै सुर्यप्रकाशामुळे जग कार्य करते तसेच आत्मामुळेच शरीर कार्य करीत असते) ||34|| अशा प्रकारे क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांतील भेद तसेच कार्यासह प्रकृतीपासून मुक्त होण्याचा मार्ग ज्ञानदृष्टीने जे योगी तत्वतः जाणतात, तेच परब्रह्म परमात्म्याला प्राप्त होतात ||35||

*****************************************************************

" परमेश्वराला सोडून  माणूस जे काही विचार करतो त्यांना भोगी , दुखी म्हणतात"

# गुणत्रयविभागयोग

---

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

ज्ञानांमध्ये अती उत्तम ते परम (सर्वश्रेष्ठ) ज्ञान मी तुला पुन्हा सांगतो की, जे जाणून सर्व मुनिजन या संसारातून मुक्त होऊन परम सिद्धी पावले आहेत. ||1|| हे ज्ञान धारण करून माझ्या स्वरूपाला प्राप्त झालेले योगी सृष्टीच्या आरंभी पुन्हा जन्माला येत नाहीत आणि प्रलयकाळी व्याकुळ ही होत नाहीत. ||2|| हे भारता (अर्थात भरतवंशी अर्जुना), माझी ब्रह्मरूप मूळ प्रकृती संपूर्ण भूतांची योनी म्हणजे गर्भधारणा करण्याचे स्थान आहे आणि मी त्या योनीच्या ठिकाणीच चेतनसमुदायरूप गर्भाची स्थापना करतो. त्या जड-चेतन संयोगाने सर्व भूतांची उत्पत्ती संभव होते ||3|| हे कौंतेया (अर्थात कुंतीपुत्र अर्जुना), नाना प्रकारच्या सर्व जातीत जितके शरीरधारी प्राणी उत्पन्न होतात, त्या सर्वांचा गर्भ धारण करणारी ब्रह्मस्वरूपीनी प्रकृती माता आहे आणि बीज (वेग-वेगळे प्रकारचे जीव) स्थापन करणारा मी पिता आहे ||4|| हे महाबाहो अर्जुना, सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुण हे प्रकृतीपासून उत्पन्न झालेले तिन्ही गुण अविनाशी त्या जीवात्म्याला शरीरात बांधून ठेवतात ||5|| हे निष्पाप अर्जुना, त्या तीन गुणांमधील सत्त्वगुण निर्मळ असल्यामुळे प्रकाश (ज्ञान) उत्पन्न करणारा आणि विकाररहित आहे. तो सुखासंबंधीच्या आणि ज्ञानासंबंधीच्या अभिमानाने जीवात्म्येला (जन्म-मृत्युशी) बांधतो. ||6|| हे कौंतेया (अर्थात कुंतीपुत्र अर्जुना), हा रागरूप रजोगुण असून इच्छा आणि आसक्ती यांपासून उत्पन्न झालेला आहे, असे समज. तो या जीवात्म्याला सकाम कर्मांच्या आणि त्यांच्या फळांच्या आसक्ती ने बांधतो ||7|| हे भारता (अर्थात भरतवंशी अर्जुना), सर्व देहाभिमानी पुरुषांना मोह

पाडणारा तमोगुण अज्ञानापासून उत्पन्न झालेला आहे, असे समज. तो या जीवात्म्याला प्रमाद, आळस आणि निद्रा यांनी बांधतो ||8|| हे भारता (अर्थात भरतवंशी अर्जुना), सत्त्वगुण सुखाला, रजोगुण कर्माला तसेच तमोगुण ज्ञानाला झाकून प्रमाद, हिंसा इत्यादि कार्यात प्रवृत्त करतो. ||9|| हे भारता (अर्थात भरतवंशी अर्जुना), रजोगुण आणि तमोगुण यांना दडपून सत्त्वगुण वाढतो. सत्त्वगुण आणि तमोगुण यांना दडपून रजोगुण वाढतो. तसेच सत्त्वगुण आणि रजोगुण यांना दडपून तमोगुण वाढतो ||10|| ज्यावेळी या देहात तसेच अंतःकरणात व सर्व इंद्रियांच्या दारात चैतन्य आणि ज्ञानरूपी प्रकाश उत्पन्न होतो, त्यावेळी असे समजावे की, सत्त्वगुण वाढला आहे. ||11|| हे भरतर्षभा (अर्थात भरतवंशीयांमध्ये श्रेष्ठ अर्जुना), रजोगुण वाढल्यावर लोभ, प्रवृत्ती, स्वार्थाने प्रेरित होऊन फळांच्या इच्छेने कर्मांचा आरंभ, अशांती आणि विषयभोगांची लालसा ही सर्व उत्पन्न होतात ||12|| हे कुरुनंदना (अर्थात कुरुवंशी अर्जुना), तमोगुण वाढल्यावर अंतःकरण व इंद्रिये यांत अंधार, यज्ञरूपी कर्तव्य कर्मांत व प्रवृत्ती नसणे, व्यर्थ हालचाली आणि झोप इत्यादी अंतःकरणाला मोहित करणाऱ्या वृत्ती ही सर्व उत्पन्न होतात. ||13|| जेव्हा हा मनुष्य सत्त्वगुण वाढलेला असताना मरण पावतो, तेव्हा तो उत्तम कर्मे करणाऱ्यांच्या निर्मळ दिव्य स्वर्गादी (रज व तमगुणरहित) लोकांत जातो ||14|| रजोगुण वाढलेला असता मरण पावल्यास कर्म आसक्त मनुष्य लोकात (जातींत) पुन्हा जन्मतो. तसेच तमोगुण वाढला असता मेलेला माणूस किडा, पशू, पक्षी इत्यादी मूढ व खालच्या (विवेकशून्य) जातींत जन्मतो ||15|| श्रेष्ठ (सात्त्विक) सात्त्विक कर्मांचे सुख, ज्ञान आणि वैराग्य इत्यादी निर्मळ फळ सांगितले आहे. राजस कर्मांचे फळ दुःख तसेच तामस कर्मांचे फळ अज्ञान, मुर्खपणा आहे ||16|| सत्त्वगुणापासून ज्ञान उत्पन्न

होतो. रजोगुणापासून निःसंशयपणे लोभ आणि तमोगुणापासून प्रमाद आणि मोहामुळे अज्ञानही उत्पन्न होतो ||17|| सत्त्वगुणात असलेले लोक स्वर्गादी उच्च लोकात जातात. रजोगुणात असलेले पुरुष मध्यलोकात राहातात आणि तमोगुणाचे कार्य असलेल्या निद्रा, प्रमाद आणि आळस इत्यादीत रत असलेले तामसी पुरुष अधोगतीला अर्थात कीटक, पशू इत्यादी नीच जातीत आणि नरकात ही जातात ||18|| ज्यावेळी द्रष्टा तिन्ही गुणांशिवाय दुसरा कोणीही कर्ता नाही, असे पाहातो आणि तिन्ही गुणांच्या अत्यंत पलीकडे असणाऱ्या सच्चिदानंदघनस्वरूप मला परमात्म्याला तत्त्वतः जाणतो, त्यावेळी तो माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो. ||19|| हा जीव शरीराच्या उत्पत्तीला कारण असलेल्या या तिन्ही गुणांना उल्लंघून जन्म, मृत्यू, वार्धक्य आणि सर्व प्रकारच्या दुःखांपासून मुक्त होऊन तो परमानंदाला प्राप्त होतो ||20||

## अर्जुन म्हणाला

या तिन्ही गुणांच्या पलीकडे गेलेला पुरुष कोणकोणत्या लक्षणांनी युक्त असतो? आणि त्याचे आचरण कशा प्रकारचे असते ? तसेच हे प्रभो (श्रीकृष्णा), मनुष्य कोणत्या उपायाने या तीन गुणांच्या पलीकडे जातो ? ||21||

## श्री(श्रेष्ठ)भगवान म्हणाले

हे पांडवा (अर्थात पांडुपुत्र अर्जुना), जो पुरुष सत्त्वगुणाचे कार्यरूप प्रकाश, रजोगुणाचे कार्यरूप प्रवृत्ती आणि तमोगुणाचे कार्यरूप मोह ही प्राप्त झाली असता त्यांचा विषाद मानत ठेवत नाही आणि वस्तु प्राप्त झाली नाही तरी त्यांची इच्छा सुद्धा करीत नाही ||22|| जो उदासीन प्रमाणे राहतो ,गुणांकडून विचलित होत नाही आणि गुण आपले कार्य करत आहेत, असे समजून जो सच्चिदानंदघन परमात्म्यात एकरूप होऊन राहतो व त्या स्थितीपासून तो कधीच ढळत नाही ||23|| जो निरंतर आत्मभावात

राहून दुःख-सुखाला समान मानतो, व माती, दगड आणि सोने यांना सारखेच मानतो, ज्याला आवडती व नावडती गोष्ट सारखीच वाटते, जो ज्ञानी आहे आणि स्वतःची निंदा व स्तुती ज्याला समान वाटतात ||24|| जो मान व अपमान सारखेच मानतो, ज्याची वृत्ती मित्र व शत्रू या दोघांविषयी समान असते, तसेच सर्व कार्यात ज्याला मी करणारा असा अभिमान नसतो, त्यालाच गुणातीत (त्रिगुणात्मक भावातून मुक्त) असे म्हणतात ||25|| आणि जो मला अव्यभिचारी भक्तियोगाने निरंतर भजतो, तोच या तिन्ही गुणांना पूर्णपणे उल्लंघून सच्चिदानंदघन ब्रह्म प्राप्त होण्यास योग्य ठरतो ||26|| कारण त्या अविनाशी परब्रह्माचा, अमृताचा, नित्य धर्माचा आणि अखंड एकरस परम सुखाचा (आनंदाचा) आश्रय स्थान व स्वामी सुद्धा मीच आहे ||27||

*************************************************************

# पुरूषोत्म योग

---

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

वरून मूळ असलेला आणि खालून फांद्या असलेले एक अश्वथ वृक्ष विशेष तो अविनाशी आहे असे म्हटले जाते. वाक्य समूह (व वेदमंत्र) त्याचे पानें आहेत. जो त्याला (व वेदांचे उत्पत्ति कोणाकडून हे) जाणतो तोच “वेदज्ञ” (संपूर्ण वेदांना जाणणारा) आहे ||1|| खाली (मनुष्य, पशु निम्नयोनी) आणि (देवादि उच्चयोनी) वर विस्तृत झालेल्या फांदे गुण द्वारा विस्तृत विषय (स्पर्श, रूप ,रस, गंध) या अंकुराने युक्त आहे. खाली जाणारे मूळ (भोग-वासना) सर्वत्र विकसित होत आहे, ते सकाम कर्माशी बांधलेले समाज “मनुष्य लोक” आहे ||2|| न रूप त्याचा (वृक्षाचा) पुर्वोक्त उप्लब्ध आहे ,न अंत, न आदि, व त्या वृक्षाचे आधार कोण आहे ? कोणीही जाणू शकत नाही. त्या अश्वथाच्या (वृक्षाचे) सुदृढ असणारे मुळाला वैराग्य रूपी शस्त्राणे (तरवारींने) तू कापूण टाक ||3|| असे केल्यानंतर (परम धाम) पदांना शोधने कर्तव्य आहे, जे प्राप्त केल्यानंतर (संसारात) जीव कधीच परत येत नाही आणि नंतर त्या आदि (परम) पुरूषाचे शरणागत होतात ज्यापासून हा संसारप्रवाह विस्तृत (उत्पन्न) झाला आहे,तो पुरुष अत्यंत प्राचीन आहे ||4|| जो (व्यक्ती) गर्व न मोह, असत् संगतीपासून मुक्त, द्वेषरहित, आध्यात्मिक ज्ञानात व आत्म नित्य तत्वात स्थिर असलेला, भोग-इच्छारहित आणि सुख-दुखः नामक द्वंदापासून मुक्त तो त्या शाश्वत पदाला (धामाला) प्राप्त करतो ||5|| त्या पदाला कोणीही प्रकाशित करू शकत नाही, न सूर्य ,न चन्द्र, न ही विघुत व अग्नी. ज्याला प्राप्त करून कोणीही (संसारात) परत कधीच येत नाही ,ते नित्य परम (सर्वश्रेष्ठ) धाम माझे आहे ||6|| निश्चित माझेच ते अंश आहेत, या जीवलोकात (जगात)

“बुध्द जीव” जो की सनातन (शाश्वत) आहे. तो (जीव) भौतिक प्रकृतीमध्ये राहून मन आणि सहा इंद्रियांसह निरंतर धोर संघर्ष करीत आहे ||7|| शरीराला जो प्राप्त होतो आणि शरीरातून जो बाहेर पडतो, तो (जीवात्मा) ईश्वर म्हणजे शरीराचे स्वामी आहे. तो (जीव) विषय ग्रहण करून (मृत्युनंतर) सर्व संकल्पना आणि सूक्ष्म (शरीर व) इंद्रियांसह तो गमन करतो ,जसे वायु (सूक्ष्म) गंध घेऊन गमन करतो ||8|| तो जीव नवीन देह धारण करून शरीराचे कान, डोळे, त्वचा, जिव्हा व नाकाचा आश्रय घेवून आणि मन निश्चय करून इंद्रिय विषय (प्राकृत भोग) समूहांचा उपभोग घेत असतो ||9|| शरीरात अंत, स्थिती व भोग घेताना आणि गुणांनी युक्त जो जीव आहे ,तो (जीव) मूर्ख लोकांना दिसू शक्त नाही ,फक्त दिसू शकतो तो ज्ञानचक्षुला (विवेकी लोकांना) ||10|| यत्नशील योगीजन त्या आत्म्याला ओळखतात जो की शरीरात अवस्थित आहे, किन्तु अविवेकी लोक किती यत्न व प्रयत्न केले तरी ते त्याला (आत्म्याला) ओळखू शक्त नाही ||11|| जो तेज सूर्यामध्ये स्थित आहे ,जो तेज या सर्व जगाला प्रकाशित करतो तो सर्वत्र आहे ,जो चन्द्रात आणि अग्नीमध्ये ही आहे ते तेज तू माझेच (माझ्यापासून उत्पन्न) समज ||12|| मी पृथ्वीमध्ये प्रवेश करून माझ्या शक्तिनेचं चर-अचर (सर्व) प्राणीमात्राला धारण करतो आणि त्यांचा पोषणही करतो. मी चन्द्र होऊन औषधांना (वनस्पतींना) पुष्ट (रसाळही) करतो ,जे की सर्वत्र आहेत ||13|| मी जठर अग्नी होऊन प्राणांच्या शरीरामध्ये आश्रय घेतो ,प्राण-अपान वायुचा संयोग करून अन्न पचवतो ,जे की (अन्न) चार प्रकारचे आहेत ||14|| तसेच सर्वांच्या ह्रदयात मी अंतर्यामी स्वरुपात अधिष्ठित असून स्मृति-ज्ञान व दोघांचे नाश माझ्यापासूनच होतात. वेदांतात सर्व मीच एकमात्र जाणणे योग्य आहे, वेदांत कर्ता (वेद व्यास) आणि वेदज्ञही

(संपूर्ण वेदांना जाणणारा) मीच आहे ||15|| दोन असे जीव आहेत जे या जगात "क्षर" आणि "अक्षर" असे म्हटले जाते. समस्त (पंचमहाभूतानी बनलेले) भौतिक जीवांना "क्षर" (नाशवान) आणि आध्यात्मिक (परम धाम) लोकात राहणारे जीवांना एकतत्व "अक्षर"(अविनाशी) पुरुष असे म्हणतात ||16|| उत्तम असे परम पुरूष तत्व जो अन्य "परमात्मा" शब्दांनी कथांत मध्येही म्हटला जातो, जो त्रैलोक्यात प्रवेश करून सर्वांचे पालन-पोषण करीत आहे, तोच ईश्वर आहे ||17|| कारण "क्षर" पासून वेगळा मी "अक्षर" पेक्षा ही सर्वश्रेष्ठ आहे. म्हणजे मीच या संपूर्ण जगात आणि सर्व वेदांमध्येही प्रसिध्द आहे .मीच (सर्वोत्तम पुरूष) "पुरूषोत्म" आहे ||18|| हे भारता ! जो मला या प्रकारे मोह न पावता मला "पुरूषोत्म" जाणतो ,तोच सर्वत्रसर्वप्रकारे भजतो मलाच सर्वभावांनी ||19|| हे भारता ! या प्रकारे अतिरहस्यपूर्ण शास्त्र माझ्या द्वारा संक्षेपमध्ये सांगितला गेला आहे, हे समजून मनुष्य (अत्यंत) बुद्धिमान होतात आणि प्रयत्न करून ते परम (धाम) सिध्दिही मिळवतात ||20||

************************************************************

# देव-आसूरसंपद विभागयोग

---

## श्री(श्रेष्ठ)भगवान म्हणाले

**|| देवी सम्पत्ति || अभियंता (भय नसणे) ,मनाची शुद्धी (प्रसन्नता) ,ज्ञान साधनेत निष्ठा, दान, इंद्रिय संयम, यज्ञ, स्वाध्याय (वेद ,शास्त्रांचे अध्ययन), तप, सरलता ||1|| अहिंसा, सत्य (प्रिय) वचन ,क्रोध शून्यता, स्त्री-पुत्रादिमध्ये ममता नसणे, शांती, परनिंदा न करणे, दया, लोभशून्यता, कोमलता, लज्जा, अचपलता (निरर्थक हालचाली न करणे) ||2|| तेज, धैर्य ,बाह्य आणि अंतरिक शुद्धि, द्रोह (हिंसा) शून्यता ,अभिमान शून्य ये सर्व गुण दैवी संपदा (स्वभाव) शूभवेळी जन्म घेतलेल्या मनुष्यांमध्ये दिसून येतात ||3|| हे पार्थ ! ढोंग ,दर्प (धन - विद्यादि चे गर्व), अभिमान (अहंकार), क्रोध, कठोरपणा आणि अज्ञान हे आसुरी संपत्तीत (असत् वेळी) जन्मलेल्या अभिमुख व्यक्तींचे गुण आहेत ||4|| दैवी संपत्ती मोक्षाचे तर असुरी संपत्ती (संसार) बंधनाचा मुख्य कारण आहे .परंतु हे पाण्डवा ! तू शोक करू नको, कारण तू दैवी संपत्तीत जन्मलेला आहेस ||5|| हे पार्थ ! या जगात दोन प्रकारचे मनुष्य समुदाय आहेत दैवी आणि असुरी. दैवी संपत्ती विस्तारानी सांगितले ,आता असूरी संपत्ती (स्वभाव) विषयी माझ्याकडून ऐक ||6||**

## आसूरी संपत्ती

**असुर (स्वभाव) लोकांस धर्मात प्रवृत्ति आणि अधर्मातून निवृत्ति नाही जाणत. त्यांच्या ठिकाणी अंतर्बाह्य (मन व शरीराची) शुद्धि असत नाही ,उत्तम आचरण आणि सत्य (प्रिय) भाषण सुद्धा असत नाही ||7|| ते जगाला खोटे, आश्रयरहित, ईश्वर शून्य, " हे जग स्त्री-पुरूषांचे संयोगातून उत्पन्न झाले आहेत " आणि काय "कामाखेरीज अन्य कोणतेही कारण**

नाही” असे म्हणतात ||8|| ते आसूरी सिद्धांताचा आश्रयकरून, आत्मतत्व (ज्ञान) नसलेल्या ,देहात्मवाद अभिमानी, हिंसादि कार्यांमध्ये प्रवृत्त झालेले असूरगण या जगाचा ध्वंस (नाश) करण्यासाठी अहितकारी व उग्र कर्मात संलग्न होतात ||9|| ते काम (भोग इच्छा) यांचे आश्रय घेतात जे की कधीच पूर्ण होणारे नाही, दंभ (धर्माचे ढोंग) ,मदाने युक्त होऊन ,मोह आदिला ग्रहण करून, असत् (अनित्य) विषयांचे इच्छा करून आणि खोटे भ्रष्ट आचरण करीत अशुभ कर्म करण्यास व्रतस्थ झालेले असता ||10|| मृत्यू येई पर्यंत असंख्य चिंतांचे ओझे घेऊन,“(काम) विषयांचा उपभोग घेणे हेच सुखी ठेवणारे व जीवनाचे परम लक्ष्य आहे” असे निश्चय करतात ||11|| असे प्रकारे असंख्य आशांमध्ये मोहित झालेले, काम (विषय भोगाची इच्छा) आणि क्रोधाचा आश्रय घेऊन ते व्यक्ती कामभोगासाठी अन्याय पूर्वक अर्थ (धन-द्रव्यादि) पदार्थांचा संग्रह करण्याचा प्रयत्न करीत असतात ||12|| ते असे विचार करतात- “आज मी हे प्राप्त केले आहे”,“आता मी ही इच्छा पूर्ण करीन”, “हे माझे आहे” आणि “परत मी हे धन मिळवून घेईन”||13|| “माझ्या द्वारा ये शत्रूगण मारले गेले आहेत” आणि “दूसरे ही मीच मारीन”. मी ईश्वर ,भोक्ता (भोग घेणारा) , सिद्धी, बलवान आणि सुखी आहे ||14|| “मी धनी आणि कुलीन (मोठ्या कुळात जन्मलेला) आहे” ,“माझ्या सारखा दुसरा कोण आहे ?”, मी यज्ञ करीन, दान करीन आणि आनंद (स्वर्ग सुख) प्राप्त करीन, असे म्हणतात. ते अज्ञानाने मोहित झालेले असतात ||15|| या प्रकारे अनेक चिंतांनी भ्रांत झालेले आणि अज्ञानात बुद्ध झालेले आसुरी लोक इंद्रियतृप्तीमध्ये अतिशय आसक्त होऊन मृत्युनंतर ते नरकात पतित (प्रकट) होतात ||16|| स्व:ताला श्रेष्ठ म्हणणारे , नम्र नसलेले, धन द्वारा मान आणि मद (द्रव्या दि) यांनी युक्त असुरगण दंभ (ढोंग) पूर्वक फक्त

नाममात्र अविधिसह यज्ञ करतात ||17|| ते अहंकार, बल, दर्प ,काम (भोग प्राप्तीची इच्छा) आणि क्रोधाच्या आश्रय घेत त्यांच्या स्वत:च्या आणि इतराचे देहांमध्ये अवस्थित मला (परमात्म्येला) आणि माझे धर्मांचे दोषा रोपण करतात, ते द्वेष करणारे आहेत ||18||ते (साधु लोकांवर) द्वेष करणारे, क्रूर आणि अशुभ कर्म करणारे नराधम ,त्या सर्वांना मी संसारात आसुरी (पशु) योनीमध्ये वारंवार निक्षेप (फेंकून) टाकीत असतो ||19|| हे कौन्तेय ! जन्मो-जन्मी ते आसुरी योनीला प्राप्त करून ते मुर्ख लोक मला प्राप्त न करून त्याहून अधम (नीच) योनिला प्राप्त करतात ||20|| तीन आत्मनाशक द्वार आहेत - काम, क्रोध आणि (मान,घन संपत्ती, स्त्रीचा) लोभ अत: या सर्वांचा त्याग अवश्य केला पाहिजे ||21|| हे कौन्तेय ! या तीन नरकाचे द्वार ,या पासून मुक्त व्यक्ती आत्म-कल्याण करणाऱ्या मार्गांचे आचरण करतो ,तोच (व्यक्ती) श्रेष्ठ गति (परम धाम) मिळवतो ||22|| जो (आसूरी व्यक्ती) शास्त्रिय विधियांच्या उल्लघं करून स्वेच्छाचारक (आपल्या मना प्रमाणे) व कामवश (भोग इच्छां हेतु) कार्यांमध्ये प्रवृत्त होतो, तो न सिद्धी प्राप्त करतो ,न सुख ,न ही परम गति (धाम) प्राप्त करू शकतो ||23|| म्हणून तुला "कर्तव्य" आणि "अकर्तव्य" यांची व्यवस्थांच्या "विषय शास्त्र" हेच प्रमाण आहे ,त्या कर्तव्य विषयरूपी शास्त्र विधानात कथीत सर्व कर्मे जाणून तू त्यास करणे योग्य हो ||24||

****************************************************

# श्रद्धात्रयविभाग योग

---

## अर्जुन म्हणाला

हे कृष्णा ! जी माणसं शास्त्रोक्त विधिला सोडून श्रद्धेने युक्त होऊन देवदिकांचे पूजन करतात, त्यांची मग निष्ठा (स्थिती) कोणती ? सत्व, रज व तामस ? ||1|| तीन प्रकारचे श्रध्दा ||

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

श्रध्दा तीन प्रकारची आहेत, ते शरीरधारी जीवात्म्येला (पुर्वजन्मांचे संस्कारानी) प्राप्त प्राकृतिक गुणांनुसार असतात ती सात्विक ,राजसीक आणि तामसिक (श्रध्दा) आहेत ,ते तू आता श्रवण कर ||2|| हे भारता ! जीवनाचे अनुरूप सर्वांची श्रध्दा असते, जो श्रध्दामय पुरूष आहे, ज्यांची ज्या वस्तुत जसी श्रद्धा असते , तसेच ते (व त्यांचे चित्त) असतात ||3|| सात्विक (गुण) असलेले (लोक) देवांची पूजा करतात, यक्ष आणि राक्षसांची पूजा करणारे "राजसी लोक" आणि भूत-प्रेतांची (शमशानात) पूजा करणारे "तामसी लोक" असतात ||4|| जे अशास्त्रीय व अविधिपूर्वक कठोर तपस्या करतात ,तेच तपस्वी लोकं आहेत. ते दंम्भ ,अहंकार ,कामना ,आसक्ति आणि (क्षणभंगुर) बळांचे अभिमानानी युक्त असतात ||5|| ते शरीराच्या भूतसमुदायाला आणि अंत:करण्यात स्थित मला (परमात्म्येला) कष्ट देणारे असतात. ते अज्ञानी, मूर्ख (तप करणारे) लोकांना तू आसूरीक धर्मांत निष्ठा असलेले जाण ||6|| आहार पण सर्वांना तीन प्रकारचे प्रिय आहेत, तसेच यज्ञ ,दान आणि तपस्या ही तीन प्रकारचे आहेत, त्यांचे निरनिराळे भेद तू माझ्याकडून ऐक ||7||

## तीन प्रकारचे आहार

आयु ,उत्साह ,बल, आरोग्य, सुख आणि प्रीति वाढविणारे, रसयुक्त,

स्निग्ध, स्थिर राहणारे स्वभावात: मनाला प्रिय वाटणारे असे भोजनाचे पदार्थं सात्विक लोकांना प्रिय आहे ||8|| कडू, आंबट, खारट, फार गरम, तिखट ,कोरडे, जळजळणारे आहारसमूह राजसी लोकांना प्रिय आहे .ते (आहार) दुख, शोक, आळस आणि रोग देणारे असतात ||9|| (एक प्रहर पूर्वीचे) ठंड, कच्चे ,रस नसलेले, दुर्गन्ध येणारे ,शिळे, उष्टे (दुसऱ्यानी खालेले) आणि अपवित्र भोजन तामसी लोकांना प्रिय आहे ||10||

## तीन प्रकारचे यज्ञ

"यज्ञांचा अनुष्ठान करणे कर्तव्य आहे" या प्रकारे मनाला एकाग्र करून शास्त्रविधीनुसार व फलाची कामनारहित व्यक्तीद्वारा जो यज्ञ अनुष्ठित केला जातो तो यज्ञ सात्विक आहे ||11|| हे भरतश्रेष्ठा ! जो भौतिक लाभासाठी, दम्भ (यज्ञांचे) फलाना प्रकाशित करून (दिखाव्यासाठी), मान कीर्ति, स्वर्गाची इच्छा ठेवून जो यज्ञ अनुष्ठित केला जातो ,तो यज्ञ राजस समज ||12|| (अशास्त्रीय) विधिहीन, अन्नदानरहित, मन्त्रहीन, उपाध्यायांना दक्षिणा न देता आणि श्रध्दाहीन यज्ञाला तामस (यज्ञ) म्हटला जातो ||13||

## तपाचे वर्णन

देव, ब्राह्मण ,गुरू आणि ज्ञानीजणांची पूजा करणे. तसेच शौच, सरळपणा, ब्रह्मचर्य आणि अहिंसा हे सर्व शरीर सम्बन्धी तप म्हटले जातात |14|| उद्वेग न देणारे ,सत्य ,प्रिय व हितकारक शब्द बोलणे आणि वेद अध्ययन करणें असे तपाला वाचिक तप असे म्हणतात ||15|| (चित्त) मनाची प्रसन्नता, सरलता, मौन, मनाचे संयम, व्यवहारामध्ये कपट नसणे आणि भावांची पूर्ण पवित्रता असणे हे मनाचे तप म्हटले जातात ||16||

## तीन प्रकारचे तप

जे तप फलांची इच्छा सोडून योगी पुरूषांकडून अत्यंत श्रद्धेने केलेल्या (वर सांगितलेल्या) तिन्ही प्रकारच्या तपाला सात्विक तप म्हटला जातो ||17||

सत्कार ,मान आणि पूजनीय होण्यासाठी तसेच दंभ (शक्ति प्रदर्शित) करीत जो तप केला जातो ,तो अनित्य आणि अनिश्चित असल्यामुळे राजसी तप आहे ||18|| मूर्खतापूर्वक, हट्टाने, स्वत:ला (शरीराला) त्रास देण्यासाठी जो तप केला जातो व दुसऱ्यांचे विनाशासाठी केला जाणारा तप तामसिक म्हटला जातो ||19||

## तीन प्रकाचे दान

"दान देणे कर्तव्य आहे" या भावनेने, प्रत्युपकार करण्यात असमर्थ व्यक्तिला व देश तिर्थस्थानी ,पुण्यकाल आणि योग्य व्यक्तिला जो दान दिला जातो, सात्विक दान म्हटला जातो ||20|| परंतु प्रत्युपकाराच्या हेतूने ,फल उद्देश्य करून व प्रायश्चित झाल्या नंतर संकुचित भावनाने जो दान दिला जातो, तो राजसिक (दान) आहे ||21|| अयोग्य स्थानात ,अयोग्य वेळी व उपकाराच्या भावाने ,जो दान अयोग्य पात्राला (व्यक्तिला) दिला जातो. तिरस्कार आणि अन्यायपूर्वक केलेला तो (दान) तामसिक म्हटला जातो ||22|| ॐ, तत् (तो), सत् (सत्य आहे) Ð "निर्देशक परब्रह्माचे" नाव तीन प्रकारे सांगितले गेले आहेत. त्यांचे द्वारा प्राचीनकाळात ब्राह्मणगण, वेद समूह आणि यज्ञसमूहांचे निर्मिती झाले आहेत ||23|| म्हणून वेद-मन्त्रांचे उच्चारण करणारे वेदवादियांचे शास्त्रोक्त यज्ञ, दान, तप,कर्म इत्यादि सर्व ॐ शब्दांचे उच्चारण करूनच सदैव अनुष्ठित (आरम्भ) होतात ||24|| "तत्" या नावने संबोधित होणारे परमात्मा हेच सर्व आहे, या भावनेने फळाची इच्छा न करता नाना प्रकारच्या यज्ञ, तप व दानरूप सर्व क्रिया मोक्ष इच्छित (कल्याणकारी) व्यक्तींकडून केला जातो ||25|| हे पार्थ ! परब्रह्मच्या भावाने, भक्तांच्या भावाने या "सत्" शब्दाचा प्रयोग होतो. तसेच मंगळ करणारे कार्यांमध्ये सुद्धा "तत्" या शब्दाचा प्रयोग केला जातो ||26|| तसेच यज्ञ, तप व दान

यामध्ये जी (सात्विक बुद्धीची) स्थिती असते त्यात “सत्” असे उच्चारला जातो आणि परमात्म्यासाठी केलेले जे निश्चय कर्म (यज्ञ) आहेत, त्यालाही “सत्” (परब्रह्म) या नावाने निर्देशित केला जातो ||27|| हे अर्जुना ! परमेश्वरावर श्रद्धा न ठेवूण केलेले (यज्ञ) हवन, दिलेले दान, केलेले तप आणि जे काही केलेले शुभ कार्य असत् असल्याने ते मेल्यावर ना ह्या (इह) लोकी ,नाही मृत्युनंतर ते (फल) लाभदायी (व्यर्थ) आहेत ||28||

*************************************************************

**"नौकरी व व्यवसाय मिळाले हे भाग्य आहे की दुर्भाग्य हे माहीत नाही पण परमेश्वराला विसरणे हे मात्र दुर्भाग्य आहे"**

# मोक्षसंन्यास योग

---

## अर्जुन म्हणाला

हे महाबाहु ! हे अंतर्यामी ! हे वासुदेवा ! मी “संन्यास” आणि “त्याग” यांचे तत्व वेग-वेगळे प्रकारे जाणण्याची इच्छा आहे ||1||

## श्री(श्रेष्ठ) भगवान म्हणाले

कित्येक पण्डितगण काम्य कर्मांचे स्वरूप: (संपूर्ण) त्यागालाच “संन्यास” जाणतात आणि सर्व कर्म फलांचे त्यागाला “त्याग” असे म्हणतात ||2|| कोणी कोणी मनीषी (विद्वान) असे म्हणतात की सर्व कर्मे दोष युक्त असतात आणि ते त्यागने योग्य आहेत .दुसरे विद्वान असे म्हणतात की यज्ञ, दान आणि तपस्यारूपी कर्मे त्यागने योग्य नाहीत ||3|| हे भरतश्रेष्ठ (अर्जुना) ! निश्चय श्रवण कर माझ्याकडून “त्याग” विषयी, हे पुरूषेश्वरा ! त्याग तीन प्रकारचे म्हटले गेले आहेत ||4|| यज्ञ ,दान आणि तपस्यारूपी कर्म पूर्णपणे त्यागने योग्य नाहीत, ते कर्तव्य कर्म अवश्य केले पाहिजेत. यज्ञ, दान आणि तप हे महात्मा लोकांचे चित्ताला सुद्धा शुध्द (शांत) म्हणजे निश्चित पापांतून मुक्त करणारे आहेत ||5|| तप इत्यादि ते सर्व कर्म आसक्तिरहित आणि फलांचा त्याग करून ते अवश्य केले पाहिजे, असे माझे निश्चित उत्तम मत आहे ||6||

## तीन प्रकारचे त्याग

परंतु नित्य कर्माचा स्वरूपत: (संपूर्ण) त्यागने योग्य नाही म्हणुन मोहाने (अज्ञानाने) त्याग करणे याला “तामस त्याग” असे म्हटले आहे ||7|| जे काही कर्म आहेत “ते दु:खरूपच आहे” असे समजून जर कोणी शारीरिक त्रासाच्या भीतीने (यज्ञ, दान आणि तप) कर्तव्य कर्म सोडून देतो, तर त्याला असा “राजस त्याग” करून त्यागाचे फल कोणत्याही प्रकारे

मिळत नाही ||8|| हे अर्जुना ! कर्तव्य समजून जो कर्म ,नित्य आणि कर्तेपणाचा अभिमान (अहंकार) नसून फलांच त्याग केला जातो , "सात्विक त्याग" मानला गेला आहे ||9|| सत्वगुणांनी संपन्न, स्थिर बुध्दि असणारा आणि संशयरहित (ज्ञानी) त्यागीगण दुख:रूपी कर्मांपासून द्वेष करत नाही आणी सुखरूपी कर्मात सुद्धा आसक्त होत नाही ||10|| देहधारी जीवाला संपूर्ण कर्मांचा त्याग करणे शक्य नाही ,परन्तु जे सर्वकर्म फलांचे त्याग करणारे आहेत तेच खरे त्यागी आहेत, असे म्हणतात ||11|| देवत्तव (सुख) ,नारकीतत्व (दुख) आणि मिश्र (मनुष्यतत्व) तीन प्रकारचे कर्मफल आहेत, जेकी मृत्युनंतर त्याग न करणारे व्यक्तीला प्राप्त होतात. परन्तु संन्यासीगण यांच्या विषयात असे कधीच होत नाही (कारण ते कर्मबंधनातुन मुक्त होऊन मोक्ष मिळवतात) ||12|| हे महाबाहो! पाच कारण माझ्यापासून श्रवण कर, जे वेदांत शास्त्रात कर्म समाप्त करण्यास (उपाय) सांगितले आहेत, जे केल्याने सर्व कर्मे सिद्ध होतात ||13|| देह, कर्ता, इंद्रिया ,विविध हाव भाव (श्वास, डोळे बंद उधड) आणि पाचवा सर्व प्रेरक अंतर्यामी असे पाच कारण आहेत ||14|| माणस शरीराने, वाणी आणि मनाचे द्वारा जे धर्म-अधर्मानी युक्त असलेले जे कर्म करतो ,ते (वर सांगितलेले) पाच त्यांचे कारण आहेत ||15|| असे जाणून सुद्धा जो व्यक्ती केवल आत्म्याला "सर्व कर्माचे कर्ता आहे", असे विचार करतो. असंस्कृत बुद्धी असल्याने तो मूर्ख काहीही पाहू व जाणू शकत नाही ||16|| ज्याला मिथ्या अंहकार नाही , ज्याची बुद्धी सकाम कर्मात आसक्त नाही .त्यांनी समस्त प्राण्यांची हत्या केले जरी वस्तुत त्यांचे हत्या करीत नाहीत म्हणजे तो पापकर्म फलांनी लिप्त होत (बांधला जात) नाही ||17|| ज्ञान , ज्ञेय आणि परिज्ञाता (ज्ञाता) हे तीन कर्म प्रवृत्तिचे कारण आहेत, तसेच कारण, कर्म आणि कर्ता हे तीन

कर्मांचे आश्रय आहेत ||18|| गुणांची संख्या करणारे शास्त्र "ज्ञान", "कर्म" आणि "कर्ता" हे गुणांच्या भेदाने तीन प्रकारचे सांगीतले गेले आहेत .ते तू माझ्याकडून ऐकून घे ||19||

## तीन प्रकारचे ज्ञान

ज्या ज्ञानामुळे माणूस "निरनिराळ्या सर्व भुतांमध्ये अविनाशी , परमात्मभाव विभागरहित, अखण्ड, अव्यय, समभावाने भरून राहला आहे" असे पाहतो ,तो ज्ञान सात्विक आहे, असे जाण ||20|| परंतु सर्व भुतांमध्ये भिन्न भिन्न नाना प्रकारचे भाव असणारे जीव-संबंधी (प्राकृत) जो ज्ञान आहे, त्या ज्ञानाला तू राजस समज ||21|| परंतु जो ज्ञान एका कार्यरूपी (आंघोळ, जेवण, झोपणे आदि) ,स्वत:ला शरीर समजून देहीक कार्यांमध्ये पूर्णपणे आसक्त करतो. तो (ज्ञान) युक्तिशून्य असून, तात्विक अर्थरहित आणि पशु सारखे तुच्छ असून ,तो ज्ञान तामस म्हटले गेले आहे ||22||

## तीन प्रकारचे कर्म

जो कर्म शास्त्र विधिपूर्वक असून अहंकाररहित ,आसक्ति शून्य ,फळांची इच्छारहित आणि राग-द्वेषादिरहित असतो ,तो कर्म सात्विक म्हटला जातो ||23|| परंतु जे कर्म फळांची कामना करून ,अहंकारी व्यक्तीद्वारा अत्यंत क्लेश (अन्याय) पूर्वक केला जातो, तो कर्म राजसिक म्हटला जातो ||24|| जो कर्म भावी क्लेश (परनिंदा) ,धर्म व ज्ञानाचे नाशासाठी, आत्मनाश व हिंसासाठी ,आपल्या सामर्थयाची सृत्ती करत आणि (अज्ञान) मोहवश केला जातो, तो कर्म तामसिक म्हटला जातो ||25||

## तीन प्रकारचे कर्ता

जो फलांची कामनारहित, अहंकारशून्य, धैर्य ,उत्साह सम्पन्न ,कार्यांची सिध्दि-असिध्दि मध्ये निर्विकार (समभाव) यांनी युक्त कर्म करीतो ,सात्विक कर्ता म्हटला जातो ||26|| जो आसक्तियुक्त, कर्मांच्या

फळांची इच्छा ठेवणारा, लोभी, हिंसाप्रिय, अशुद्ध आचरणाच्या , हर्ष नंतर शोक करणारा, तो कर्ता राजस म्हटला जातो ||27|| अनुचित कार्यप्रिय ,स्वभावनुसार हावभावनी युक्त, अनम्र , शठ, दुसऱ्याच्या अपमान करणारा ,आळशी, शोक करणारा आणि दीर्घसूत्री असणारा (असे माणसाला) तामस कर्ता म्हटला जातो ||28|| हे धनंज्या ! गुणानुसार "बुध्दि" आणि "घृतिचे" ही तीन भेद आहेत. मी थोडक्यात संपूर्ण आता सांगणार आहे, ते तू आता श्रवण कर ||29||

## तीन प्रकारची बुद्धि

हे पार्थ ! जो प्रवृत्ति-निवृत्ति, कार्य-अकार्य , भय , अभय आणि बंधन-मोक्ष जाणतो, त्यांचीच बुध्दि सात्विक आहे ||30|| हे पार्थ ! जो धर्म-अधर्म आणि कार्य -अकार्य काय आहे ? यर्थाथ रूपानी जाणत नाही, त्याची बुद्धी राजसी आहे ||31|| हे पार्थ ! जी बुद्धी अधर्माला धर्म मानते आणि सर्व धर्म विषयांचे उलटे अर्थ (निंदा) करते. असे तामसा मुळे त्यांची बुद्धी भ्रष्ट झाल्यामुळे ,ती बुद्धी तामसी आहे ||32||

## तीन प्रकारची घृति

हे पार्थ ! योगअभ्यासपूर्वक ज्या अव्यभिचारिणी (यम-नियम-प्राणायामादि) घृति द्वारा मन, प्राण आणि इंद्रियांचे क्रियांना जे योगी नियमित करतात, ती घृति सात्विक आहे ||33|| हे पार्थ ! हे अर्जुना ! जो पुरूष धर्म, काम आणि अर्थाला धारण करून ,आसक्त मनाने व फल-आकाक्षा ठेवून घृति करतो, ती घृति राजसी आहे ||34|| अविवेकी ,मदांनी युक्त होऊण ज्या घृति द्वारा निद्रा ,भय, शोक, विषाद आणि विषय भोगपासून उत्पन्न होणारे सुखांचा त्याग करीत नाहीत, तामसी घृति आहे ||35|| हे भरतश्रेष्ठा ! आता सुख विषयी तीन प्रकारे माझ्याद्वारा श्रवण कर, ज्यांचे पुनः पुनः अभ्यासा द्वारा संसाररूपी दुखांचा

अंत होतो, तो सुख सात्विक आहे ||36||

## तीन प्रकरचे सुख

जे काही सुख आरंभी विष (त्रासा) सारखे पण परिणामात (नंतर) अमृतासारखे आहे आणि जे आत्म विषयी बुद्धी प्रसादाने (भक्तियोगाने) उत्पन्न होतो ,त्या सुखाला सात्विक म्हटला जातो ||37|| विषय इंद्रिय संयोगाने जे सुख उत्पन्न होतात, ते शुरूवातीला अमृता सारखे परिणामात विषासारखे (दुख देणारे) आहेत ,तो सुख राजसी आहे ||38|| जो सुख आगोदर आणि नंतर आत्म स्वरूपाला आवृत्त (मोहित) करणारा आहे. जो (सुख) झोप, आळस आणि प्रमाद (हिंसा) द्वारा उत्पन्न होतो, तो तामसिक सुख आहे ||39|| पृथ्वीवर अर्थात मनुष्य आदि, व स्वर्गात आणि काय देवगणात असलेले प्राणी व असे पदार्थही नाही जे की प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या या तीन गुणापासून मुक्त आहे ||40||

## चार प्रकारचे मनुष्य वर्ग

हे परंतपा ! ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य (व्यापारी, श्रेतकरी) आणि शूद्रांचे (नौकरशाही) कर्म स्वभावत्: उत्पन्न गुणांचे अनुरूप निरनिराळे (मनुष्य) वर्गात केले आहेत ||41|| शम (शांती) , दम (आत्मसंयम) , तप, शौच (पवित्रता) , सहिष्णुता , सरलता, ज्ञान , विज्ञान (वेद शास्त्रांचे ज्ञान) आणि आस्किता (धार्मिकता) हे सर्व ब्राह्मणांचे स्वभावाने उत्पन्न कर्म आहेत ||42|| शौर्य, तेज, धृति ,दक्षता ,युद्धातून पलायन न करणे, दान देने आणि लोकांचे नेतृत्व आणि रक्षा करणे हे सर्व क्षत्रियांचे स्वाभाविक कर्म आहेत ||43|| कृषि, गोरक्षा ,वाणिज्य आदि (व्यवसाय करणे) वैश्यांचे स्वाभाविक कर्म आहेत आणि दुसऱ्यांच्ये सेवा करणें शुद्रांचे स्वभाविक कर्म आहेत ||44||

## स्वकर्म- ईश्वर सेवा

आप-आपल्या अधिकार अनुसार कर्मांमध्ये निपुण माणसं योग्यता रुपी

सिद्धी प्राप्त करून घेतात. ते सर्व निपुण असलेले व्यक्ती कसे सिद्धी प्राप्त करतात, ते तू आता श्रवण कर ||45|| ज्यांचे द्वारा या सर्व जीवांची उत्पत्ति होते आणि ज्यांनी हे संपूर्ण जग व्यापले आहे .मनुष्य आपल्या कर्मा द्वारा त्या परमेश्वराची उपासना करून सिद्धी मिळवतात ||46|| दुसऱ्यांच्ये धर्मापेक्षा उत्तम रूपाने अनुष्ठित केलेले स्वधर्मच लोकांच कल्याण करणारा आहे. कारण मानव स्वाभाविक (नियमित) कर्म करून पापानी लिप्त होत नाही ||47|| हे कौन्तेय ! कर्म (पशुयज्ञ, युद्ध) दोषयुक्त असले तरी स्वाभाविक (दान, तप, यज्ञ, उपासना इत्यादि) कर्मांचा त्याग नाही केला पाहिजे. कारण सर्व कर्मे दोषांनी आवृत्त आहे ,जसे अग्नी धूराने आवृत्त आहे ||48||

## नैष्कमर्यसिद्धि

सर्वत्र आसक्तिरहित बुद्धि असलेली ,निस्पृह (कामनाशून्य) आणि अंत:करण जिंकलेल्या मनुष्याला स्वरूपत कर्म त्याग करून नैष्कमर्य रूपी श्रेष्ठ सिध्दि प्राप्त करतो ||49|| हे कौन्तेय ! सिध्दि प्राप्त केलेल्या व्यक्ती ज्या साधनद्वारा परब्रह्मची प्राप्ती करतो, जो की ज्ञानाची परमगति (सर्वश्रेष्ठ लक्ष्य) आहे, ते सर्व साधना तू आता माझ्याकडून आता थोडक्यात श्रवण कर ||50|| विशुद्ध बुद्धियुक्त होऊन, घृति द्वारा मन संयत करून, शब्दादि विषयांच्या त्याग करून, राग-द्वेषांना (आसक्ति-विरक्ति) लांब करून ||51|| पवित्र निर्जन (तीर्थ) स्थानी राहून , अल्पआहारपूर्वक , काय - मनवाक्य (इन्द्रिय) संयतकरून सर्वदा परमात्म (ॐ) ध्यानयोग आणि वैराग्याचा आश्रय घेत ||52|| अहंकार, बल ,दर्प, काम ,क्रोध आणि परिग्रहाच्या (दान-ग्रहणाचा) त्याग करून ,(देह) ममता शुन्य आणि उपशम (शांतता) प्राप्त केलेले योगी ब्रह्म अनुभवाचे योग्य होतात ||53|| ब्रह्ममध्ये अवस्थित, प्रसन्नचित व्यक्ती न शोक (दुख) करतो न आकांक्षा

ठेवतो. ते सर्वत्र प्राणीमात्रांबदल समभाव ठेवणारे योगी माझ्या प्रेममय भक्तिला प्राप्त करतात ॥54॥

## समर्पणाचा योग

जो माझे विभूत्तिसंपन्न, जसे माझे स्वरूप आहे .त्याला तत्वत ,अनन्य भक्तिनेच जाणू शकतो. तो भक्त माझ्या प्रेमा भक्तिचे बळाने मला तत्वत जाणून ,माझ्या नित्य लीला मध्ये (धामात) प्रवेश करतो ॥55॥ माझे एकान्त भक्तगण सर्व कर्म करीत असले जरी. ते माझ्या कृपेणे नित्य, अव्यय, (दिव्य वैकृण्ठ) धामाला प्राप्त करतात ॥56॥ हे अर्जुना ! तू अहंकारशून्य चित्त द्वारा सर्व कर्म मला समर्पित करून आणि बुद्धी (भक्ती) योगाचा अवलंबन करून माझे परायण हो आणि निरंतर माझ्या ठिकाणी चित्त युक्त असलेला हो ॥57॥ माझ्या ठिकाणी चित्त ठेवल्याने तू माझ्या कृपेने सर्व संकटातून सहजच पार होशील आणि जर अंहकारामुळे माझे सांगणे न ऐकशील तर संसारात नाश (दुख) पावशील ॥58॥ अंहकाराच्या आश्रय घेऊन तू असे मानतोस की "मी युद्ध करणार नाही" ,तो निश्चय व्यर्थ आहे .कारण तुझा (क्षत्रिय) स्वभाव तुला जबरदस्तीने युद्ध करावयास लावतील ॥59॥ हे कौन्तेय ! जे कर्म तू मोह वश करू इच्छित नाहीसं, तेही आपल्या पूर्वोक्त स्वाभाविक कर्माने बद्ध असल्यामुळे पराधीन होऊन अवश्य करशील ॥60॥ हे अर्जुना ! ईश्वर सर्व प्राणी मात्रांच्ये हृदयात अवस्थान करतात आणि आपल्या योग मायेने-यंत्र आरूढ सारखे सर्व जीवांना त्यांचा (पूर्वजन्मात केलेले) कर्मानुसार (दुखरूपी) संसार चक्रात फिरवितात ॥61॥ हे भारता ! सर्व प्रकारे तू ईश्वराचेच शरणात जा (आश्रय घे) ,ज्यांच्या कृपेने तू नित्य परम शांती आणि परम, नित्य धाम प्राप्त करशील ॥62॥ या प्रकारे गुप्त ज्ञान माझा द्वारा सांगीतला गेला आहे. आता तू या रहस्यमय ज्ञानाचा संपूर्णपणे

चांगले प्रकारे विचार करून मग जसे तुला आवडेल तसेच कर ||63|| सर्वांपासून अत्यंत रहस्य पूर्ण माझे हे वाक्य पुन: श्रवण कर, तू माझे परम मित्र आहेस, अतएव तुझ्या हितासाठी सांगेन ||64|| तू मला आपले चित्त समर्पित कर, माझ्यात (नाम-रूप-गुणादि किर्तनात) मत् परायण होऊन माझा भक्त हो, माझे पूजन करणारा हो ,मला नमस्कार कर अशा प्रकारे तू मलाच प्राप्त करशील ,मी तुला सत्य प्रतिज्ञा करतो, कारण तू मला अतिशय प्रिय आहेस ||65|| (वर्ण-आश्रमा दि शारीरिक आणि मानसिक) सर्व धर्मांचा परित्याग करून एकमात्र माझेच शरण ग्रहण कर, म्हणजे मी तुला सर्व पापापासून मुक्त करीन ,तू शोक करू नको ||66|| या गीता शास्त्राला तू कधीही असंयमित ,अभक्त ,सेवाविहिन आणि माझे द्वेष करणारे लोकांना सांगू नये ||67|| जो मनुष्य या गीता शास्त्राचा उपदेश माझ्या भक्तांना देतील ते माझ्या प्रति पराभक्ती प्राप्त करून संशय शून्य होऊन मलाच प्राप्त होतील ||68|| मनुष्यांमध्ये “गीता” ची व्याख्या (प्रचार) करणारा पेक्षा अधिक कोणीहिं माझे प्रिय कार्य करणारा नाही आणि या समस्त जगात त्यांच्या पेक्षा अधिक कोणीही मला प्रिय नाही व होणार ||69|| आणि जो व्यक्ती आपल्या दोघांच्या या धर्म संवादाचा अध्ययन करतील ,त्याचे द्वारा मी “ज्ञान यज्ञाद्वारा” पूजिला जाईन, असे माझे मत आहे ||70|| जे श्रद्धावान आणि द्वेषरहित लोक याचा (गीतेचा) श्रवण जरी करत असतील, ते पण पापमुक्त होऊन पुण्य कर्मे करणारे श्रेष्ठ (उच्चतम) ग्रह लोकांना प्राप्त होतील ||71|| हे पार्थ ! हे गीताशास्त्र तू एकाग्र चित्ताने ऐकलेस का ? आणि हे धनंजया ! तुझे अज्ञानातून उत्पन्न झालेला हा मोह नाहीसा झाला का? ||72||

## अर्जुन म्हणाला

हे अच्युता ! आपल्या कृपेणे माझे हे मोह नष्ट झाले आहे आणि मी

आत्मस्मृत्ति प्राप्त केली आहे ,माझे सर्व संशय निघून गेले आहेत आणि मी यथा ज्ञानात अवस्थित झालो आहे. म्हणुन मी आपल्या आज्ञांचे पालन करीन ||73||

## संज्जय म्हणाला

असे प्रकारे मी महात्मा वासुदेव आणि पार्थ अर्जुन यांच्या मध्ये झालेल्या या अद्भुत रोमांचकारी संवादाला ऐकले ||74|| श्रीवेदव्यासांच्या कृपेणे मी हे साक्षात वर्णकारी स्वयं साक्षात योगेश्वर श्रीकृष्णापासून या परम रहस्यमय ज्ञानाला ऐकले आहे ||75|| हे राजन ! श्रीकेशव आणि अर्जुनाचे या पुण्य अद्भुत संवादाला वारंवार स्मरण करून मी वारंवार हर्षित होत आहे ||76|| हे राजन ! श्रीहरीचें या अत्यंत अद्भुत रूपांचा वारंवार स्मरण करून मी अत्यधिक विस्मय (आनंदीत) आणि पुन: पुन्हा हर्षितही होत आहे ||77|| जिकडे श्रीयोगेश्वर आणि अर्जुन आहेत ,तिकडेच श्री (राज्यलक्ष्मी) आहे ,विजय, ऐश्वरयवृध्दि ,आणि न्याय परायणता (धर्म नीति) विघमान आहे हेच माझे निश्चित असे (उत्तम) मत आहे ||78||

*************************************************************



**"नारद मुनी हाच खरा कृष्ण भक्त आहे , सदैव श्रीकृष्ण भावना भावित राहणें हेच परम सुख देणारा आहे"**

**|| नारायण नारायण ||**

## *नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम्॥*

*(भगवद्गीता ४:३१)*

"हे कुरूश्रेष्ठ अर्जुना ! जो (शास्त्रात वर्णित) यज्ञ करत नाही त्याला (अल्प सुखविशिष्ट) मनुष्यलोक सुद्धा सुखदायक नाही ,मग अन्य (पर) लोक व पुढील जीवन कसे सुखदायक असतील" (मनुष्याला "नित्य श्रीगीतापाठ" ज्ञानयज्ञ आणि "हरे कृष्ण" महामंत्र संकीर्तन जपयज्ञ अवश्य केला पाहिजे).

### नित्य केल्या जाणाऱ्या यज्ञांचे प्रकार:

१.द्रव्यमयरूपी यज्ञ (अन्न धन दान, अग्निहोत्रीरूपी हवन).

२.ज्ञानरूपी यज्ञ ( नित्य वेदअध्ययन,श्रीभगवद्गीता, १८ श्रीमद्भागवत पुराण , रामायण , १८ पुराणांचे श्रीकृष्ण परमेश्वरावर श्रद्धा ठेवून पाठ करणें ).

३.योग-अभ्यास, ॐ ध्यानरूपी व ॐ चा उच्चारणरूपी यज्ञ

४.जपयज्ञ "हरे कृष्ण" महामंत्र व "ॐ नमो भगवते वासुदेवाय" नाम संकीर्तन निरंतर जपयज्ञ करा अणि समृद्ध व्हा. हेच जीवन पद्धति ह्या दुखरूपी संसाररूपीसमुद्रातू मुक्त होण्याचा एकमात्र साधन आहे. त्या योग्याला परम (सर्वश्रेष्ठ) योग **भक्तियोग असे म्हणतात. हे सर्व यज्ञ पवित्र व पापांचे नाश करणारे आहेत म्हणून** ते यज्ञ अवश्य करून पहा.




**॥ नित्य श्रीभगवद्गीता, रामायण, पुराणांचें पाठ करा धन, संपत्ति आणि मोक्ष मिळवा ॥**

"हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे। हरे राम हरे राम , राम राम हरे हरे ॥